बंकिमचंद्र साहित्य-माला–५

# इंदिरा
व
# युगलांगुरीय

[ संक्षेपित आवृत्ति ]



: लेखक :
बंकिमचंद्र चट्टोपाध्याय

: अनुवादक–संक्षेपक :
भा. वि. वरेरकर



नवभारत प्रकाशन संस्था,
मुंबई ४.

# प्रस्तावना

● १८७३ सालीं ' वंगदर्शन ' मासिकाच्या चैत्र महिन्याच्या अंकांत ' इंदिरा ' ही कथा संपूर्ण प्रकाशित झाली होती. त्यानंतर त्याच स्वरूपांत तिच्या पुस्तक रूपानें दोन आवृत्त्या निघाल्या. १८८६ सालींच बंकिमबाबूंच्या छोट्या कथा एकाच भागांत प्रसिद्ध झाल्या, त्या चौथ्या आवृत्तींत देखील या कथेची पृष्ठसंख्या पंचेचाळीस होती. १८९३ सालीं या कथेची पांचवी आवृत्ती प्रसिद्ध झाली ती मागल्या चारी आवृत्त्यांपेक्षां वाढवून लिहिलेली होती, त्याच आवृत्तीवरून प्रस्तुत कथा लिहिलेली आहे. या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत बंकिम-बाबूंनीं लिहिलें होतें: —

" इंदिरा लहान होती. ती आतां मोठी झाली आहे. प्रत्येक लहान असलेली व्यक्ती मोठी होत असते. लहानाला मोठें करणें, किंवा मोठ्याला लहान करणें हें काम असतें राजाचें. समाज देखील असाच लहानाला मोठा आणि मोठ्याला लहान करीत असतो. मी लहान होतों तो ज्याच्या इच्छेनें मोठा केला गेलों त्या ईश्वराचें कामच करतों आहें. यापेक्षां अधिक कैफियत काय देऊं ?

" इंदिरा लहान होती ती मोठी झाली हें बरें झालें कीं वाईट झालें तें सांगतां येणें कठीण आहे. लहानानें लहानच रहावें. लहान व्यक्ती मोठी झाली तर ती काय चांगली होते ? पण पुष्कळशा लहान व्यक्ती हें कांहीं कबूल करीत नाहींत, मग इंदिरेनें तरी बऱ्यावाईटाची कबुली कां द्यावी ?'

" इंदिरेची पृष्ठसंख्या वाढविण्याचें कारण कुणी विचारलें तर त्याचें उत्तर देण्यासाठीं आपल्या पुस्तकाचें समालोचन आपल्यालाच करावें लागेल. तसें करणें माझ्याकरवीं होणें शक्य नाहीं. विज्ञ वाचक छोटी इंदिरा लक्षपूर्वक

वाचतील तर तींत कोणते दोष होते आणि ते आतां या नव्या आवृत्तींत कसे दुरुस्त केले आहेत, तें त्यांना आपोआप कळून येईल. सध्यां तरी जुन्या नांवानें हें नवें पुस्तक प्रसिद्ध होत आहे खरें. लेखकाला नवें पुस्तक लिहायचा पूर्ण अधिकार आहे. हीच ग्रंथकाराची कैफियत आहे."

१९१८ सालीं जे. डी. अण्डरसन यांनीं 'Indira and other stories' या शीर्षकाखालीं या कथेचें इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध केलें होतें. १८९७ सालीं म्हैसूर येथून श्री व्यंकटाचार्य यांनीं या कथेचें कानडी भाषांतर प्रसिद्ध केल्याचें दिसून येतें.

'युगलांगुरीय' ही कथा ताम्रलिप्त ( तमलुक ) इथें घडलेल्या एका घटनेवरून लिहिली गेली होती. इंदिरा आणि युगलांगुरीय या दोनही कथा एकाच वेळीं लिहिल्या गेल्या. याच वंग भाषेंतील पहिल्या लघुकथा होत. युगलांगुरीय ही कथा 'वंगदर्शन' मासिकाच्या १८७४ सालच्या वैशाख महिन्याच्या अंकांत प्रसिद्ध झाली होती. पुढें ती दोन वर्षांनीं पुस्तक रूपानें प्रसिद्ध झाली. बंकिमबाबूंच्या हयातींत या कथेच्या पांच आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या होत्या, त्यांतील पांचव्या आवृत्तीच्या आधारें प्रस्तुत अनुवाद करण्यांत आला आहे.

बंकिमबाबूंचे जांवई राखालचंद्र बंदोपाध्याय यांनीं १८९७ सालीं या कथेचा इंग्रजी अनुवाद प्रसिद्ध केला होता. १९१३ सालीं पी. एन्. बसू आणि मोरेनो यांनींही या कथेचा इंग्रजी अनुवाद ज्याप्रमाणें प्रसिद्ध केला होता त्याचप्रमाणें ॲण्डरसनच्या पुस्तकांतही ही कथा समाविष्ट केली होती. बंकिमचंद्रांच्या हयातींतच के. आर. भट यांनीं १८८० सालीं या कथेचा हिंदी अनुवाद प्रकाशित केला होता.

आत्मचरित्रात्मक पद्धतीनें लिहिलेली 'इंदिरा' ही पहिलीच कादंबरी होय. 'विषवृक्ष' कादंबरींतील कांहीं भाग पत्ररूपानें लिहिला गेला आहे. त्यानंतर बंकिमबाबूंनीं प्रथमपुरुषीं लिहिलेल्या कथेचा हा पहिलाच प्रयोग केला असल्याचें दिसून येतें.

— मामा वरेरकर

# १

★ फार दिवसांनीं मी सासुरवाडीला जायला निघालें होतें. १९ वर्षें होईपर्यंत मी सासरीं गेलें नव्हतें. त्याचं कारण एकच—माझा बाप होता श्रीमंत अन् सासरा होता दरिद्री. लग्न झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं मला घेऊन जाण्यासाठीं माझ्या सासऱ्यानं माणूस पाठवला होता. त्याच्याकडे माझ्या बापानं निरोप पाठवला, " व्याह्यांना सांगा, कीं आधीं आमचे जावई-बुवा स्वतः चार पैसे मिळवायला शिकूं देत. मग त्यांनीं आपल्या बायकोला घेऊन जावं. आतां माझी मुलगी तिथं जाऊन खाईल काय ?"

तो निरोप ऐकून माझ्या नवऱ्याला चीड आली. त्याचं वय त्यावेळीं होतं वीस वर्षं. त्यानं प्रतिज्ञा केली, कीं स्वतः मिळवता व्हायचं अन् मग संसार थाटायचा. नोकरी मिळवायच्या उद्देशानं तो पश्चिमेकडे जायला निघाला. त्यावेळीं रेल्वे नव्हती अन् तो रस्ताही मोठा बिकट होता. हातीं पुरेसा पैसा नसतांनाही सारा रस्ता पायपीट करीत तो पंजाबांत जाऊन पोंहचला.

एवढे कष्ट करायचं ज्याचं सामर्थ्य होतं त्याला नोकरी मिळवणं कांय कठीण होतं ? माझा नवरा पगारदार झाला, घरीं पैसे पाठवूं लागला, पण सात आठ वर्षं तो आपल्या गांवीं आला नव्हता कीं त्यानं माझी वास्तपुस्तही केली नव्हती. मी रागानं भडकून गेलें होतें. असे पैसे हवे होते तरी किती ? उगीच पैसे मिळवण्याची गोष्ट काढून माझ्या आई-बापांनीं त्याला दुखवल्याची मला चीड आली होती. माझ्या सुखापेक्षां पैसा का अधिक होता ? पैसे-रुपये घेऊन मी सागरगोटे खेळत असें. मला वाटे, एके दिवशीं जमिनीवर रुपये पसरावे आणि त्याच्यावर झोंपून पहावें—मग कळेल का तें सुख !

एके दिवशीं मी आईला म्हटलं, " आई, मी रुपये अंथरून झोंपणार आहें." आई म्हणाली, " वेडी कुठली ! " आईला माझा उद्देश कळला.

तिनं कोणतं कवटाळ केलं कोण जाणे, पण ज्या वेळचा हा इतिहास मी लिहितें आहें, त्यापूर्वी कांहीं दिवस माझा नवरा आपल्या घरीं जाऊन पोंहचला. सारे लोक बोलत होते कीं तो कमिसेरिएट ( म्हणजे काय कोण जाणे ! ) होऊन खूप पैसे मिळवून गब्बर झाला आहे.

माझ्या सासऱ्यानं माझ्या बापाला लिहून पाठवलं, " आपल्या आशीर्वादानें उपेंद्र ( माझ्या नवऱ्याचं नांव उपेंद्र—नांव बोलून गेलें—जुन्या माणसांनीं मला क्षमा करावी—आजच्या भाषेंत बोलायचं म्हणजे—' माझा उपेंद्र ' असं म्हणायला हवं. ) आपल्या वधूचें प्रतिपालन करायला समर्थ झाला आहे. मेणा भोई पाठवले आहेत. त्यांच्याबरोबर सूनबाईची रवानगी करावी. अजूनही तुम्ही तिला पाठवली नाहीं तर आम्हाला मुलाच्या दुसऱ्या विवाहाची व्यवस्था करावी लागेल. "

बाबांना वाटलं—माणूस मोठा झालाय खरा ! मेण्यांतल्या गाद्या खिनखापी होत्या. मेण्यावर चांदीची कळाशी केलेली होती. मेण्याच्या दांडीला चांदीचीं मकरमुखं होतीं. जी एक मेली दासी आली होती ती नेसली होती रेशमी साडी. तिच्या गळ्यांत टपोऱ्या सोनेरी दाण्याची मोहनमाळ होती. मेण्याबरोबर चौघेजण दाढीवाले भोजपुरी आले होते.

माझे बाबा हरमोहन दत्त हे मोठे व्यवहारी माणूस होते. ते हंसून म्हणाले, " पोरी इंदिरे, आतां यापुढं कांहीं तुला इथं ठेवून घेतां येत नाहीं. आतां जा. लवकरच तुला घेऊन येईन. "

माझी धाकटी बहीण कामिनी म्हणाली, " आतां तूं केव्हां येणार आहेस आक्का ? " मी तिच्या गालाला चिमटा घेतला तेव्हां ती म्हणाली, " सासुरवाडी कशी असते तें तुला माहीत आहे का आक्का ? "

मी म्हटलं, " आहे तर ! तें असतं नंदनवन. तिथं रतिपती पारिजात फुलांचा बाण मारून माणसाच्या जन्माचं सार्थक करीत असतो. तिथं पाऊल देतांक्षणींच सामान्य स्त्रीची अप्सरा होते अन् पुरुष मेंढरू बनतो. तिथं बारा महिने कोकिळा कुहू कुहू करते. हिंवाळ्यांतसुद्धां दक्षिणेचे वारे वहातात. अमावास्येला पूर्णचंद्र उगवतो—"

कामिनी हंसली आणि म्हणाली, " जळ्ळं तुझं तोंड तें ! "

● ●

**हिणीच्या** तोंडचा हा आशीर्वाद घेऊन मी सासुरवाडीला जायला निघालें. माझं सासर होतं मनोहरपूरला. दोन्ही गांवांत दहा कोसांचं अंतर होतं. सकाळींच जेवण उरकून जायला निघालें होतें. पोंचायला चारपांच घटका रात्र होईल याची मला जाणीव होती.

म्हणूनच माझ्या डोळ्यांना पाणी आलें. रात्रीची वेळ—ते कसे आहेत तें नीटसे दिसणारसुद्धां नाहींत—मी कशी आहें तें त्यांनाही नीटसे दिसायचं नाहीं. आईनं निघतांना मोठ्या हौसेनं माझा खोपा घातला होता. दहा कोस प्रवास करतांना खोपा सुटून केंस मोकळे पडले असते. बंद केलेल्या मेण्यांत असल्यामुळं मी घामानं डबडबून गेलें असतें. ओंठावरचा विड्याचा रंग सुकून गेला होता. थकून गेल्यामुळें मी कशी दिसलें असतें कोण जाणे !

तुम्ही हंसतां आहांत ? माझी शपथ आहे तुम्हाला—हंसूं नका. ऐन तारुण्याच्या भरांत मी पहिल्यानेंच सासुरवाडीला जायला निघालें होतें हें विसरूं नका.

वाटेंत काळीदिघी नांवाचं एक मोठं सरोवर होतं. तें चांगलं अर्धा कोस लांब होतं. चांगलं डोंगरासारखं उंचावर होतं तें. त्याच वाटेनं जायचं होतं. चारी बाजूला वडाचीं झाडं होतीं. त्यांची शीतल छाया, सरोवराचं निळ्या मेघासारखं पाणी भारी सुंदर दिसत होतं. तिथं माणसांची वस्ती फारशी नव्हती. घाटावर काय तें एक दुकान होतं. जवळच जें गांव होतं त्या गांवालाही काळीदिघी हेंच नांव होतं.

या जागीं एकटं यायला लोक भीत असत. तिथं दरवडेखोरांची भीति होती, त्यामुळं या रस्त्यानं मेळाव्याशिवाय कुणी एकटा जात नसे. ‘ डाकूंची काळी-दिघी ’ असं नांव या भागाला पडलं होतं तें या डाकूंच्या भीतीमुळंच. तो तिथला एकुलता एक दुकानदार त्या डाकूंचाच साथीदार आहे असं लोक म्हणत.

मला मात्र कसलीच भीति वाटत नव्हती. माझ्याबरोबर बरेच लोक होते—सोळा भोई, चार दरवान, शिवाय इतरही लोक होते.

आम्ही या जागीं पोंचलों तेव्हां अडीच प्रहर दिवस उलटून गेला होता. थोडं कांहीं खाल्ल्याशिवाय आपल्याला पुढची मजल झेंपायची नाहीं असं भोई म्हणूं लागले तेव्हां दरवानांनीं त्यांना बजावून सांगितलं, कीं ही जागा धोक्याची आहे, अशीच मजल मारणं बरं—पण भोयांना तें पटलं नाहीं. ते म्हणाले, " आम्ही एवढीं माणसं आहों मग कसली भीति बाळगायची ? "

आमच्या बरोबरच्या माणसांनीं तोंपर्यंत कांहीं खाणं-पिणं केलं नव्हतं. शेवटीं भोयांचंच म्हणणं सर्वांना पटलं आणि त्यांनीं तिथं मुक्काम ठोकला. त्या सरोवराच्या घाटावर वडाच्या झाडाखालीं त्यांनीं माझा मेणा उतरला. माझ्या अंगाचा भडका झाला होता. एकदां लवकर मुक्कामाला पोंचावं म्हणून मी देवाला सारखे नवस करीत होतें, तोंच हे मेले भोई मेणा खालीं उतरून हाशूहुश् करीत मळक्या पंचानं वारा घेत होते !

काय हें ! स्त्री-जात मोठी स्वार्थी ! ती आपल्या पुरतं पहातेंय. मी होतें त्यांच्या खांद्यावर—अन् खांद्यावर घेऊन मला वाहून नेत होते ते ! ऐन तारुण्याच्या भरांत मी निघालें होतें नवऱ्याच्या भेटीला—अन् ते जात होते उपासपोटीं मूठभर भाताच्या शोधासाठीं—त्यांनी मळका पंचा घेऊन वारा घेतला तर मला राग कां यावा ? धिःक्कार असो या तारुण्याला !

अशा रीतीनं मी विचार करीत बसलें होतें. सारे लोक दूर गेले असं दिसलं तेव्हां मी धीर करून मेण्याचं दार उघडलं अन् सरोवराकडे नजर फेंकली. दुकानासमोर बसून भोई आणि दरवान वडाच्या सावलींत फराळ करीत होते. माझ्यापासून ते सुमारें दीड बिघा अंतरावर होते.

मी पाहिलं—निळ्या निळ्या मेघासारखं तें अफाट सरोवर दूरवर पसरलं होतं. त्याच्या चारी बाजूला डोंगर होते. जिकडे तिकडे डोंगराच्या पायथ्याशीं वडाचीं झाडंच झाडं दिसत होतीं. डोंगरावर गाई-वासरं चरत होतीं. पक्षी मधून मधून पाण्यावर चोंच मारून उडून जात होते. झुळझुळ वहाणाऱ्या वाऱ्यामुळं सरोवराच्या पाण्यावर स्फटिकासारखे तरंग उठत होते. त्यांच्या आंदुळण्यामुळं पाण्यांतलीं कमळं आणि शेवाळ सारखीं डुलत होतीं.

मी पाहिलं, तों आमचे दरवान पाण्यांत उतरून स्नान करीत होते. त्यांच्या त्या हालचालीमुळं निळ्या निळ्या पाण्यावर पांढरीं-पांढरीं मोतीं विखुरलीं जात होतीं.

मी आकाशाकडे पाहिलं—किती सुंदर निळं निळं होतं तें! वर पांढरे पांढरे ढग थराथरांनं रचले जात असतांना त्यांतून वेगवेगळ्या मूर्ती निर्माण होत होत्या. छोटे छोटे पक्षी उडत असतांना त्या निळ्या आकाशाच्या चादरीवर ढगांचे पांढरे शिटकाव झाडल्यासारखे दिसत होते. असं वाटलं, माणसाला पक्ष्यासारखं उडतां यायची विद्या कुणाला साध्य झाली नाहीं का! मी पक्षी असतें—मला पंख असते तर एकदम उडून नसतें कां गेलें मी मुक्कामावर?

पुन्हा सरोवराकडे माझी नजर गेली. मी थोडीशी घाबरलें. भोयांखेरीज बाकीचे सर्व लोक स्नानासाठीं पाण्यांत उतरले होते. दोन बाया होत्या माझ्याबरोबर-एक सासरची अन् एक माहेरची. त्या दोघीही पाण्यांत उतरल्या होत्या. मी थोडीशी घाबरलें. जवळ कुणी नाहीं. ही भयाण जागा—इथं थांबलों तें बरं केलं नाहीं. काय करायचं? कुलवधू होतें ना मी? तोंड उघडून कुणाला हांक मारायची कशी?

इतक्यांत मेण्याच्या दुसऱ्या बाजूला कसलातरी आवाज झाला. पलिकडल्या वडाच्या झाडावरून खालीं कांहींतरी पडल्यासारखं वाटलं. मी त्या बाजूचं दार थोडंसं उघडून पाहिलं—एक कळाकुट्ट भला जाडजूड माणूस मला तिथं दिसला. भीतीनं मी दार बंद केलं—यावेळीं दार उघडं ठेवणंच बरं असं माझ्या ध्यानांत आलं—मी दार उघडतें न उघडतें तोंच आणखी तशाच एका माणसानं झाडावरून खालीं उडी घेतली. पहातां पहातां आणखी एक जण आला—पुन्हां एकानं उडी घेतली — एका मागून एक चार असामी झाडावरून उडी मारून आले आणि माझा मेणा खांद्यावर घेऊन एकदम पळत सुटले.

तें पहातांच, 'कोन है रे कोन है रे' करीत आमचे दरवान आरडा-ओरडा करीत पाण्याबाहेर आले.

त्यावेळीं मला कळून चुकलं, कीं मी डाकूंच्या हातीं सांपडलें. आतां लाज कसली धरायची? मेण्याची दोन्हीं दारं उघडलीं. उडी मारून पळून जावं असा विचार करीत होतें पण माझ्याबरोबरचीं माणसं आरडा-ओरड करीत मागून येत आहेत असं पाहून मला धीर आला.

पण थोड्याच वेळांत तो भ्रम दूर झाला. वाटेंतल्या झाडांवरून कितीतरी डाकू उड्या मारून खालीं आले. हीं वडाचीं झाडें पाण्याच्या कांठीं होतीं. ज्या

झाडांखालून माझा मेणा वाहून न्यायला त्यांनीं सुरवात केली होती, त्याच झाडांवरून उड्या घेऊन हे डाकू हातीं लाठ्या आणि झाडांच्या फांद्या घेऊन खालीं आले होते.

डाकूंचीं संख्या मोठी असल्याचं पाहून माझ्याबरोबरचे लोक मागं हटले. आतां निराश होऊन मेण्यांतून उडी मारावी असा विचार करीत होतें पण मेणेवाले पळत जात असल्यामुळं उडी मारणं भीतीप्रद होतं. तितक्यांत एका डाकूनं माझ्यावर लाठी उगारून म्हटलं, " खालीं उतरलीस तर टाळकं फोडीन. " तेव्हां मीही स्वस्थ बसून राहिलें.

आमचा एक दरवान धीर करून पुढं आला, त्याला एका डाकूनं लाठीचा फटका मारला. तो जो खालीं पडला तो उठलाच नाहीं. तें पाहून बाकीचे सारे लोक पळून गेले.

एक प्रहर रात्र होईपर्यंत मला वाहून नेण्यांत येत होतं. आतां जिथं मेणा उतरला तें एक जंगल होतं. तिथं काळोख होता. डाकूंनीं एक मशाल पेटवली. एकजण माझ्यापाशीं आला आणि म्हणाला, " तुझ्या जवळ काय असेल नसेल तें आमच्या हवालीं कर, नाहींतर प्राणाला मुकशील. मी सारे दागिने आणि कापडचोपड, अंगावरच्या दागिन्यासुद्धां काढून त्यांच्या हवाली केलं. हातांतल्या बांगड्या सौभाग्यचिन्ह म्हणून मी काढल्या नव्हत्या, त्याही त्यांनीं काढून घेतल्या. त्यांनीं एक जुनं फाटकं लुगडं मला नेसायला दिलं आणि माझ्या अंगावरचं मोलवान लुगडं काढून घेतलं. मेणा मोडून टाकला आणि त्याला लावलेली सारी चांदी काढून घेतली. शेवटीं त्यांनीं त्या मेण्याला आग लावून त्याची राख करून दरवडेखोरीचा मुद्दापत्ता नाहींसा करून टाकला.

शेवटीं तेही निघून गेले. त्या भयाण जंगलांत रात्रीच्या वेळीं हिंस्रपशूंच्या भक्षस्थानीं पडेन या भीतीनें, ते जात असतांना मी रडून त्यांची विनवणी केली, पण त्यांनीं ऐकलं नाहीं. त्यांतला एक म्हातारा डाकू माझी दया येऊन म्हणाला, " पोरी, तुझ्यासारख्या तरण्याताठ्या मुलीला घेऊन जायचं कसं ? तूं आमच्या बरोबर असलीस तर तेवढ्याचसाठीं आम्हांला पकडतील. " एक तरणा डाकू म्हणाला, " ही मिळाली तर मी तुरुंगांतसुद्धां जाईन. मी सोडणार नाहीं हिला—" तो आणखी जें कांहीं बोलला तें लिहितां यायचं नाहीं. तो म्हातारा

डाकूंचा सरदार होता. त्या तरण्याच्या अंगावर लाठी उगारून तो म्हणाला, " असं कांहीं बोललास तर टाळकं फोडीन या लाठीनं. असलं पाप करीत नसतों आम्ही. "

ते सारे निघून गेले.

• •

## ३

★ असं कधीं झालं होतं का? एवढीं संकटं, एवढीं दुःखं कुणाला कधीं भोगावीं लागलीं होतीं का? नवऱ्याची पहिलीच भेट होणार म्हणून मी निघालें होतें. हिऱ्यामोत्यांचे अलंकार घातले, नीटनेटकी वेणीफणी केली, विडा खाऊन तोंड रंगवलं आणि अंगावर अत्तर माखून एकोणीसाव्या वर्षी नवऱ्याला भेटायला निघालें—हें माझं यौवन पतिदेवतेच्या चरणीं कसं अर्पण करायचं याचा विचार करीत होतें तोंच अकस्मात् हा वज्राघात झाला. दागदागिने काढून घेतले — घेओत! फाटकं तुटकं घाणेरडं वस्त्र नेसायला दिलं—देओत! भुके तहानेनं जीव जायला आला—जाईना का—जीव नकोसाच झाला होता—पण जर जगलें तर जायचं कुठं? कशी भेट होणार माझ्या पतीची? अन् आईबापही नाहीं का भेटायचे—? माझं रडूं अनावर झालं.

रडायचं नाहीं असा निश्चय करीत होतें पण डोळ्यांतलं पाणी आवरत नव्हतं. आवरायचा प्रयत्न करून पहात होतें तोंच दूर कोणाची तरी गर्जना ऐकूं आली. मला वाटलं वाघ. मला आनंद झाला. वाघानं खाल्लं कीं ग्रंथ संपला. नरडं फोडून वाघ रक्त शोषून खाईल—तेंही सहन करीन. मरण येईल हेंच काय तें सूख—

रडू आवरलं, थोडीशी हुषार झालें, स्तब्ध होऊन राहिलें—मी वाघाची वाट पहात होतें. पालापाचोळ्यांत कुठं खसखस आवाज झाला तर वाघ आलासा वाटे—पण रात्र उलटून जाऊं लागली तरी वाघ आला नाहीं. मी हताश झालें. म्हटलं, हें एवढं जंगल, आणि कुठंतरी साप खात्रीनं असतील. जंगलांत फिरलं तर सापावर पाय पडेल आणि मग सुटेन या यातनें-तून म्हणून हिंडूं लागलें. पायाला कांटे बोंचले पण साप डसला नाहीं. भुकें

तहानेनें व्याकूळ झालें. पुढं पाय उचलेना. मोकळीशी जागा पाहून बसलें. तितक्यांत समोर एक अस्वल दिसलें. म्हटलं याच्या हातून तरी मरण यावं. अस्वलाच्या अंगावर चाल करून गेलें तों तें मला भिऊन झाडावर चढून बसलें. झाडावरून घूं घूं असा आवाज आला. तिथं मधाचं पोळं असावं. त्याच आशेनं अस्वल वर गेलं असावं अन् म्हणूनच त्यानं माझ्याकडे डोळेझांक केली.

रात्र संपतां संपतां माझा डोळा लागला. झाडाला टेकून मी झोंपी गेलें.

• •

## ४

★ **जा**गी झालें तेव्हां कावळे अन् कोकिळा ओरडत होत्या. कळकीच्या बेटांतून सूर्याचे किरण मधून मधून दिसूं लागले होते. उजाडलं तेव्हां पाहिलं, तों डाकूंनीं माझे सारे सौभाग्यअलंकार काढून घेऊन मला विधवा बनवलं होतं. रडत रडत मीं शेजारची एक वेल तोडून घेऊन उजव्या हातांत कांकणासारखी बांधली.

मी चोंहीकडे नजर फेंकली—जिथं मी बसलें होतें तिथं जवळपास असलेल्या झाडांच्या फांद्या छाटलेल्या होत्या. कांहीं झाडं मुळांतून तोडलीं होतीं. त्यांचे बुंधे तेवढे दिसत होते. कुणीतरी लांकूडतोड्या आतां येईल अशी आशा उत्पन्न झाली. गावांत जायला इथून रस्ता असावा. दिवसाचा उजेड दिसतांक्षणींच जगायची आशा पुन्हां जागी झाली - एकुणीस वर्षंच वय होतं ना माझं!—माग काढीत काढीत निघालें तेव्हां एक पुसटशी मळलेली वाट दिसली. पुढं पुढं ती बरीच मोठी होत गेली. गांवाचा पत्ता लागेलसं वाटलं.

आतां एक पेंच पुढं उभा राहिला—गांवांत जायचं कसं ? डाकूंनीं मला नेसायला जें वस्त्र दिलं होतं त्यानं सारं अंग कांहीं झांकलं जात नव्हतं. कसंबसं ढुंगण झांकण्यापुरतंच होतं तें वस्त्र. माणसांच्या वस्तींत जायचं कसं ? त्यापेक्षां इथंच मरावं.

पण सूर्य उगवला होता. पृथ्वी हंसूं लागली होती. पक्षी किलबिल करीत होते. वेलीवरची फुलं डोलूं लागलीं होतीं. पुन्हा जगावंसं वाटलं. शेजारच्या झाडा-

वरचीं मोठींशीं पानं काढलीं, तीं बारक्या वेलींनीं गुंफलीं अन् कसंबसं अंग झांकून घेतलं. तें पाहून मला कुणी वेडीच म्हटलं असतं.

तशीच मळलेल्या वाटेनं जायला निघालें, पलिकडे कुठंतरी गाय हंबरली. मला वाटलं गांव जवळ आलं. पायांत त्राण राहिलं नव्हतं. इतकी पायपीट करायची संवय होती कुठं ? त्यांतून सारी रात्र जागरण—सारी रात्र मानसिक आणि शारीरिक कष्ट—भुके तहानेनं कहर केलेला—वाटेंतच मी थकून एका झाडाला टेकून पडलें. पडतांक्षणींच मला झोंप लागली.

थोड्या वेळानं कुणाचा तरी हात लागल्यानं मी जागी झालें. तो एक तरुण होता. बहुधा कुणबी असावा तो. माझा हात धरून मला ओढीत होता. सुदैवानं जवळच एक लाकूड पडलं होतं तें हातीं घेऊन मी त्या चांडाळाचं टाळकं शेकलं. एवढी ताकद कुठून आली देव जाणे ! तो डोकं चोळीत पळत गेला.

मी ती काठी टाकून दिली नाहीं. काठीवर भार देऊन हळुहळु चालायला सुरवात केली. बराचसा रस्ता चालून गेल्यावर एक म्हातारी भेटली. तिला मी महेशपूरचा रस्ता विचारला. ती म्हणाली, " कोण ग तूं मुली ? तुझ्यासारख्या सुंदर मुलींनीं असं आड वाटेला फिरणं बरं का ? नाहीं ग बाई चल. माझ्या घरीं चल. " मी तिच्या घरीं गेलें. मी भुकेलेली आहें असं पाहून तिनं गाईचं दूध पिळून आणलं आणि मला पाजलं. तिला महेशपूर माहीत होतं. तिला मी म्हटलं, मला नेऊन महेशपूरला पोंचव. मी तुला चांगली बक्षिसी देईन. " ती म्हणाली, " हा घरसंसार टाकून मी जाऊं कशी ? तुला मी वाट दाखवतें." तिनं दाखवलेल्या वाटेनं मी चालूं लागलें. संध्याकाळपर्यंत पायपीट करीत होतें. अगदीं थकून गेलें होतें. वाटेंत एक वाटसरू भेटला त्याला महेशपूर किती दूर आहे म्हणून विचारलं तेव्हां तो दचकून म्हणाला, " बाई, तुम्ही वाट चुकलां. बरोबर उलट्या दिशेनं आलां. इथून महेशपूर एका दिवसाच्या वाटेवर आहे. "

माझ्या डोळ्यांसमोर काजवे चमकले. मी त्या गृहस्थांना विचारलं तेव्हां ते म्हणाले, " मी इथं जवळच गौरीग्रामला जातों आहें. " मी त्यांच्या मागोमाग निघालें. गांव जवळ आलं तेव्हां त्यांनीं मला विचारलं, " कुणाच्या घरीं जाणार तूं ? " मी म्हटलं, " तिथं माझी कुणाची ओळख नाहीं. कुठंतरी झाडा-

खालीं पडून राहीन. ” त्यानीं विचारलं, “ तुझी जात कोणती ? ” मी म्हटलं, “ मी कायस्थ ! ” ते म्हणाले, “ मी आहें ब्राह्मण. तूं माझ्याबरोबर चल. फाटकंतुटकं नेसली आहेस खरी पण तूं कुणीतरी मोठया घरची दिसतेस. असलीं सुंदर मुलं हलक्या लोकांच्या घरीं जन्म घेत नसतात. ”

आग लागो या रूपाला. सुंदर सुंदर म्हणून ऐकतां ऐकतां माझं डोकं भणाणूं लागलं होतं.पण हा ब्राह्मण म्हातारा होता. मी त्याच्याबरोबर निघालें.

दोन दिवस त्या ब्राह्मणाच्या घरीं आराम घेतल्यावर माझ्या अंगांत जरा ताकद आली. तो म्हातारा पुरोहित होता. माझ्या अंगावरचं वस्त्र पाहून त्याला दया आली. त्यानं विचारलं, “ तुझं वस्त्र कुणी काढून घेतलं का ? ” मी ‘ होय ’ म्हटलं तेव्हां त्यानं यजमानाकडून मिळालेली अहेराची साडी मला नेसायला दिली. अशाच मिळालेल्या बांगड्या त्यांच्या घरीं होत्या, त्याही मी मागून घेतल्या.

हें सारं होत असतांना माझ्या जिवाला यातना होत होत्या. देह कोसळत आला होता. भटजींच्या बायकोनं घांसभर भात खायला घातला. एक चटई दिली ती आंथरून निजलें. एवढे हाल झाले होते तरी माझा डोळा लागेना. माझ्या जन्माचं मातेरं झालं होतं. मला वाटलं, आतां मरणच बरं. पुन्हा पुन्हा तेंच मनांत येत होतं अन् त्यामुळं झोंप लागत नव्हती.

पहांटेच्या सुमाराला डोळा लागला. कसलीं तरी भयंकर स्वप्नं पडत होतीं. सकाळीं उठलें त्यावेळीं सारं आंग ठणकूं लागलं होतं. पाय सुजले होते. उठून बसण्याइतकीसुद्धां शक्ती अंगांत नव्हती.

अंगाला लागलेला ठणका बरा होईपर्यंत त्या ब्राह्मणाच्या घरीं राहिल्याखेरीज गत्यंतर नव्हतं. त्या उभयतांनींही माझी फार काळजी घेतली. जरा बरं वाटलं, पण महेशपूरला जायला कुणी सांपडेना. बरोबर कुणीतरी बाई हवी होती. पण जिला रस्ता माहित होता ती यायला तयार नव्हती अन् जी यायला तयार होती तिला रस्ता माहित नव्हता. कांहीं पुरुषमाणसांनीं सोबत करायचं ठरवलं पण त्यांच्याबरोबर जायला धीर होईना. अन् ब्राह्मणानंही नको म्हटलं. ते म्हणाले, “ बऱ्या चालीचीं नव्हेत हीं माणसं. बरोबर यायला कां तयार झालीं आहेत कोण जाणे. मी घरंदाज माणूस — तुझ्यासारख्या सुंदर मुलीला अशा माणसांबरोबर कसा पाठवूं ? ” अर्थात मी स्वस्थ राहिलें.

त्या गांवचे कृष्णदास बसू नांवाचे एक गृहस्थ सहपरिवार कलकत्त्याला जायला निघाले आहेत असं कळलं. मला वाटलं, ही संधि बरी आहे. कलकत्त्याहून माझं सासर आणि माहेर हीं दोन्हीही फार दूर होतीं खरीं, पण तिथं आमच्या दूरच्या नात्यांतले एक काका नोकरीसाठीं राहिले होते. तिथं त्यांचा तपास केला अन् ते भेटले तर ते मला माझ्या बापाच्या घरीं पोंचती करतील—निदान माझी खबर त्यांना कळवतील, अशी आशा माझ्या मनांत उत्पन्न झाली.

मी त्या ब्राह्मणाला माझी कल्पना सांगितली. ते म्हणाले, "हा विचार चांगला आहे. कृष्णदासबाबू माझे यजमान आहेत. ते वृद्ध गृहस्थ आहेत अन् मोठे सत्शील आहेत. तुला बरोबर घेऊन जायला मी त्यांना सांगतों."

ते मला घेऊन कृष्णदासबाबूंकडे गेले. ते म्हणाले, "ही गृहस्थाघरची मुलगी आहे. वाटेंत आपत्ती आल्यामुळं संकटांत सांपडून वाट चुकून या गांवीं आली आहे. आपण हिला घेऊन कलकत्त्याला गेलां तर ती तिथून आपल्या गांवीं जाऊन पोंचायचा मार्ग काढील."

कृष्णदासबाबूंनीं संमती दिली.

दुसऱ्या दिवशीं मी त्यांच्या घरीं गेलें. घरच्या बायका मंडळींनीं माझं नीटसं स्वागत केलं नाहीं, तरीही त्यांच्याबरोबर मी कलकत्त्याला जायला निघालें. पहिल्या दिवशीं चारपांच कोस पायीं चालल्यावर आम्हीं गंगेच्या काठीं येऊन पोंहचलों. दुसऱ्या दिवशीं होडींत बसून आम्हीं कलकत्त्याला जायला निघालों.

● ●

## ५

★ **मी** गंगानदी केव्हां पाहिली नव्हती. आतां गंगा पाहातांच आनंदानं माझं हृदय भरून आलं. साऱ्या हालअपेष्टा घटकाभर विसरून गेलें. तें अफाट गंगेचं पात्र, त्याच्यावर येणाऱ्या छोट्या लहरींवर चमकणारे सूर्याचे किरण—नजर पोंचत होती तिथवर चमकतं पाणी सारखं पळत होतं. कांठावर मुद्दाम केलेल्या कुंजासारख्या झाडांच्या रांगा लागलेल्या होत्या. नदींत वेगवेगळ्या प्रकारच्या होड्या होत्या. त्यांच्या वल्ह्यांचें तीं पाण्यावर आदळल्यावर आवाज ऐकूं येत होते. नावाड्यांची बडबड ऐकूं येत

होती. ही पाण्यावरची बडबड, तशीच कांठावरच्या घाटावरची बडबड—कुठले कुठले लोक घाटावर जमून स्नानसंध्या करीत होते!

तसंच कुठं कुठं पांढऱ्या ढगांसारखं नदीकाठचं वाळवंट दिसत होतं. किती प्रकारचे किती तरी पक्षी वेगवेगळ्या स्वरांत तिथं किलबिलत होते. खरोखरच गंगा पुण्यमयी! तें गंगेचं ध्यान पहात असतांना डोळ्यांची भूक भागलीशी वाटली.

कलकत्त्याला पोंचायच्या आदल्या दिवशीं संध्याकाळच्या सुमाराला भरती आली. होडी थांबवावी लागली. एका गांवच्या घाटावर आमची होडी नेऊन बांधली. किती गंमत दिसली तिथं! छोट्या छोट्या होडींत बसून मच्छिमार लोक मासे धरीत होते. घाटावर बसलेले ब्राह्मण पंडित जोरजोरानं शास्त्रचर्चा करीत होते. नटून थटून आलेल्या गांवच्या बायका पाणी भरायला आल्या होत्या. कुणी कळशा घांशीत होत्या, त्या धूत होत्या, पाणी भरून ओतीत होत्या, हांसत होत्या, बोलत होत्या, पुन्हां पाणी फेंकून देऊन पुन्हा कळशा भरीत होत्या. तिथं मला दोन मुली दिसल्या. त्यांना मी कधीं विसरणार नाहीं. दोघीही सात आठ वर्षांच्या होत्या. दिसायला ठाकठीक होत्या—पण तशा सुंदर नव्हत्या—पण सजल्या होत्या अगदीं नीटनेटक्या. कानांत डूल, हातांत गळ्यांत एक एक ठळकसा दागिना, डोकींत फुलांची वेणी, पायांत पैंजण अन् कडेवर छोट्या छोट्या दोन कळशा घेऊन आल्या होत्या. पाणी भरतांना त्या गात होत्या. एक जण एक चरण म्हणे अन् दुसरी दुसरा. त्यांची नांवं विचारलीं मी—एक होती अमला आणि दुसरी निर्मला. मीं त्यांचं गाणं ऐकण्यांत अगदीं तल्लीन झालें होतें तें पाहून बसूबाबूंची पत्नी म्हणाली, "कसलं तें जळ्ळं गाणं ऐकते आहेस?" मी म्हटलं, "काय बिघडलं त्यांत?" ती म्हणाली, "मेल्या पोरी आचरट दिसतात. गृहस्थाघरच्या पोरींनीं असं घाटावर गायचं का?"

मी म्हटलं, "सोळा वर्षांच्या मुलींच्या तोंडीं गाणं शोभायचं नाहीं कदाचित, तेंच सात वर्षांच्या मुलीच्या तोंडीं मोठं मिष्ट लागतं. जवानाच्या हातची थप्पड बसली तर राग येतो, पण तीन वर्षांच्या पोरानं चापटी मारली तर गुदगुल्या होतात!" बसूंची गृहिणी यावर कांहीं बोलली नाहीं. नुसती घुम् होऊन बसली. मी

विचार करूं लागलें. मी म्हटलं, हा भेद कां ? एकच गोष्ट दोघांना दोन प्रकारें कां जाणवते ? गरीबाला दान दिलं तर तें पुण्य समजलं जातं, पण अधिकाऱ्याला दिलेले पैसे म्हणजे खुशामतीची लांच म्हणतात. खरं तें खरंच, पण तें बोलायला गेलं तर आत्मश्लाघा होते. क्षमा म्हणजे माणुसकी, पण दुर्जनाला क्षमा केली तर तें महापाप कां व्हावं ? कुणी बायकोला जंगलांत सोडली तर लोक त्याला महापापी म्हणतात, पण रामानं सीतेला वनवासाला पाठवली त्याला महापापी कां म्हणत नाहींत ?

होडींतून जातां जातां दुरून कलकत्ता दिसूं लागला. पहातांच मी जशी चकित झालें तशीच घाबरून गेलें. वाड्यांवर वाडे, घरांवर घरं, घरांच्या डोक्यावर घरं अन् पाठीवरही घरं—जसा कांहीं घरांचा समुद्रच—अंत नाहीं, संख्या नाहीं, सीमा नाहीं. जहाजांच्या डोलकाठ्यांचं जंगल बघून मी थक्क होऊन गेलें. असंख्य जहाजं, त्यांचे असंख्य प्रकार, त्यांच्यावरचीं असंख्य माणसं—एवढ्या नौका माणसानं बांधल्या तरी कशा ? घाटाशीं आलें त्यावेळीं मला दिसून आलं, कीं कांठावरच्या राजरस्त्यावर गाड्यामेण्यांची रांग मुंग्यासारखी लागली होती. पायीं चालणाऱ्यांची तर मोजदादच करतां येत नव्हती. मला वाटलं, या सगळ्या माणसांच्या वना जंगलांतून माझ्या काकाचा शोध लागणार कसा ? वाळवंटावरच्या वाळूच्या राशींत ओळखीचा एक कण शोधून काढायचा कसा ?



## ६

★ **कृष्णदासबाबू** कलकत्त्याला आले होते ते कालीघाटावर नवस फेडायला. त्यांनीं भवानीपूरला मुक्काम केला होता. त्यांनीं मला विचारलं, "कुठं आहे तुझ्या काकाचं घर ? कलकत्त्याला कीं भवानीपूरला ?"

मला कुठं माहित होतं तें ? त्यांनीं पुन्हा विचारलें, "कलकत्त्याला कोणत्या रस्त्यांत घर आहे त्यांचं ?"

तेंही मला कांहीं माहीत नव्हतं. महेशपूर हें जसं एक गांव तसंच कलकत्ताही एक गांव आहे, असा माझा समज होता. कुणा गृहस्थाचं नांव विचारलं तर

त्याचा पत्ता कुणीही सहज सांगेल असं मला वाटलं होतं. पण आतां पहातें तों कलकत्ता म्हणजे एक प्रचंड इमारतींचा समुद्र दिसला. आमच्या काकांचा पत्ता लागायचा कांहीं उपाय दिसेना. कृष्णदासबाबूंनीं माझ्या वतीनं पुष्कळ तपास केला; पण कलकत्त्यांत एका सामान्य माणसाचा पत्ता लागणार होता कसा ?

कालीचा नवस फेडल्यावर कृष्णदासबाबू काशीला जाणार असं ठरलं होतं, त्याप्रमाणें ते निघाले तेव्हां मला रडूं कोसळलं. त्यांची बायको म्हणाली, " तूं माझं सांगणं ऐक, कुणाच्या तरी घरीं कामवाली म्हणून रहा. आज आमची सुबी येणार आहे तिला सांगेन. ती तुला नोकरीला ठेवील. "

तें ऐकतांच मी मोठमोठ्यानें रडूं लागलें. शेवटीं मोलमजुरी करणंच का माझ्या नशिबीं होतं ? कृष्णदासबाबूंना माझी दया आली, पण ते तरी काय करणार होते ? मी एका कोंपऱ्यांत बसून पोटभर रडून घेतलं.

संध्याकाळच्या सुमाराला बाबूंजींच्या बायकोनं मला बोलावलं. ती म्हणाली, " सुबू आतां आली आहे. तिच्या घरीं कामाला राहायचं असलं तर मी तिच्याकडे शब्द टाकतें. " उपाशी मरावं लागलं तरी बेहत्तर पण मोलकरणीचं काम करायचं नाहीं, असा मी मनाचा निश्चय केला होता. तरीपण ही सुबू कोण ती पहावी म्हणून मी गेलें. तशी ती पहाण्याजोगी होती खास ! बरेच दिवसांत अशी सुंदर स्त्री माझ्या नजरेला आली नव्हती. ती होती माझ्याच वयाची. वर्णानं माझ्यापेक्षां फारशी उजळ नव्हती. तिचा पोषाख फारसा भडक नव्हता. अंगावरचे दागदागिनेही बेताचेच होते. तरीपण पहातांच तिच्यावर नजर खिळे. तिचा चेहरा जसा कांहीं फुललेल्या कमळासारखा—चोंहींकडून सापाच्या फणासारख्या गुंफलेल्या वेण्यांतून जणूं कमळ डोकावत होतं. चांगले मोठे टपोरे डोळे—केव्हां थंड, तर केव्हां हंसरे. दोन गुलाबाच्या पाकळ्यांसारखे टुकटुकित ओंठ, नाजुक जिवणी—अगदीं उमलल्या कळीसारखी होती ही सुबू.

मी कांहीं पुरूष माणूस नव्हे—जातिवंत स्त्री—मलाही माझ्या सौंदर्याचा कांहीं कमी अभिमान नव्हता. तरीपण नदीवरच्या तरंगासारखी झुळझुळणारी ती बाई पाहून मला क्षणभर भुरळ पडली. सुबूच्या बरोबर एक तीन वर्षांचं मूल होतं, तें देखील एक छोटीशी उमलती कळी होती. उठत होतं, पडत होतं, बसत होतं,

खेळत होतं, हालत होतं, डुलत होतं, नाचत होतं, धांवत होतं, हांसत होतं, बडबडत होतं, कुणाला मारीत होतं तर कुणाच्या गळीं पडत होतं ! मी सारखी नजर लावून सुबूला आणि तिच्या मुलाला पहातेंय असं पाहून कृष्णदासबाबूंची बायको तिडकून मला म्हणाली, " बघतेस काय ? काय म्हणणं आहे तुझं ?"

" कोण ही ? " मी विचारलं.

बाईसाहेब वसकन अंगावर येऊन म्हणाल्या, " तें सुद्धां सांगायला हवं का ? ही सुबू ! दुसरी कोण ? "

तें ऐकून सुबू थोडीशी हंसली आणि म्हणाली, " तिला नीट सांगायला नको का मावशी ? नवीन माणूस ती. मला कुठं ओळखतेय ?—" असं म्हणून ती माझ्याकडे पाहून म्हणाली, " माझं नांव सुभाषिणी बरं का ग—अन् ही माझी मावशी. लहानपणापासून ही मला सुबू म्हणते. "

आतां स्वतः बाईसाहेबांनीं मधें तोंड घातलं. त्या म्हणाल्या, " कलकत्याच्या रामराम दत्तांच्या मुलाबरोबर लग्न झालंय हिचं. भारी मोठीं माणसं आहेत तीं. लहानपणापासूनच सासरीं असते. फार दिवसांत आम्हीं पाहिली नव्हती. आम्ही कालीघाटावर आलों आहों तें कळलं म्हणून भेटायला आली आहे. फार बडीं माणसं आहेत तीं. असल्या बड्या माणसांच्या घरीं नोकरी करणं झेपेल का तुला ? "

मी हरमोहन दत्तांची मुलगी—पैसे अंथरून त्यावर निजायला निघालें होतें—अन् मला ही विचारतेय कीं बड्या माणसांच्या घरीं नोकरी करणं मला झेपेल का म्हणून ! माझ्या डोळ्यांत पाणीही आलं अन् गालांत हसूंही आलं.

तें इतरांना दिसलं नाहीं, पण सुभाषिणीनं पाहिलं. ती आपल्या मावशीला म्हणाली, " मी बाजूला घेऊन हिला सारं कांहीं विचारून घेतें. तिला पटलं तर तिला बरोबर घेऊन जाईन. " असं म्हणून सुभाषिणीनं माझा हात धरून मला शेजारच्या एका खोलींत नेलं. तिथं दुसरं कुणी नव्हतं. तिचं मूल तेव्हढं बागडत बागडत तिथं आलं होतं. तिथं एक माचा होता. त्याच्यावर सुभाषिणी बसली अन् माझा हात धरून तिनं मला आपल्या जवळ बसवलं. ती म्हणाली, " तूं विचारलं नाहींस तरी मी माझं नांव तुला सांगितलं. तुझं नांव काय ग ताई ? "

'ताई!' नोकरीच करायची असली तर हिच्याच हाताखालीं करावी असं मनाशीं ठरवून मी म्हणालें, "माझीं दोन नावं आहेत. एक चालू नांव आणि दुसरं ठेवलेलं, तेंच मी यांना सांगितलं. अर्थात तुमच्यापाशीं मी तेंच सांगतें. माझं नांव कुमुदिनी."

मूल म्हणालं, "तुमुडिनी."

सुभाषिणी म्हणाली, "बरं बरं. मूळ नांव न का कळेना, जातीनं कायस्थच ना?"

मी हंसून म्हटलं, "आम्ही कायस्थ."

सुभाषिणी म्हणाली, "कुणा घरची मुलगी, कुणा घरची सून, अन् घर कुठं तें सध्या कांहीं मी विचारीत नाहीं. आतां मी काय म्हणतें तें ऐक. तूं थोरामोठ्या घरची कुणीतरी आहेस हें मी केव्हाच ओळखलंय. तुझ्या हाताला अन् गळ्याला दागिन्यांची खूण अजूनही दिसतेय. तुला मी कांहीं हलकं काम द्यायची नाहीं. तुला सैंपाक करतां येतो का?"

मी म्हटलं, "हो. आमच्या घरीं मी सैंपाक करीत असें." सुभाषिणी म्हणाली, "आमच्या घरीं आम्ही सारींच सैंपाकाला लागतों—(मधेंच मूल म्हणालं, 'मी थैपाकी') तरीपण इथल्या रीतरिवाजाप्रमाणं आमच्या घरीं एक सैंपाकीण आहे. ती बया जाणार आहे घरीं—(मूल म्हणालं 'तल आई घलीं दातों') सासूबाईंना सांगून तुला तिच्याजागीं ठेवून घेईन. सैंपाकणी-सारखा कांहीं तुला सैंपाक करायला नको. आम्ही सारीं रांधतों वाढतों तशी तूंही रांधीत वाढीत जा. कसं? राजी?" मूल म्हणालं, "आजी? औं? आजी?"

आई म्हणाली, "तूं पाजी."

मूल म्हणालं, "मी बाबू—बाबा पाजी."

"असं बोलायचं नाहीं बरं बाळ!" मुलाला हळुच असं दरडावून ती माझ्याकडे पाहून म्हणाली, "रोज असंच म्हणतो हा!"

मी म्हटलं, "तुमच्यापाशीं मोलकरणीचं काम करायलाही मी राजी आहें."

ती म्हणाली, "तुम्ही काय म्हणतेस? हें अहो-जाहो कशाला ताई? अहो-जाहो कर सासूबाईंना! त्यांचीच तेवढी थोडीशी भीति वाटतेय मला. त्यांचा

स्वभाव आहे जरा किरकिरा—त्यांची मर्जी संपादन करायला हवी तुला—तें तुला खास जमेल. ”

“ माणसाची पारख आहे मला. ”

“ आतां सांग मला. कबूल ? ”

मी म्हटलं, “ कबूल न करून काय करूं ? दुसरं काय करणार आहें मी ?” पुन्हा माझे डोळे भरून आले.

ती म्हणाली, “ असं कां म्हणतेस ?—आतां जरा थांब. महत्त्वाचीच गोष्ट विसरून गेलेंय मी. ही आलेंच हं ! ”

सुभाषिणी तशीच तडक मावशीपाशीं गेली आणि म्हणाली, “ काय ग, ही तुमची कोण ?—”

एवढेच शब्द मला ऐकूं आले. तिच्या मावशीनं काय उत्तर दिलं तें मला ऐकूं आलं नाहीं. माझ्याबद्दल तिला जेवढं कांहीं माहीत होतं तेवढंच तिनं सांगितलं असावं. पुरोहित भटजींनीं सांगितलेल्या हकिकतीपेक्षां तिला तरी अधिक काय माहित होतं ?

यावेळीं मात्र मूल तिच्या बरोबर गेलं नव्हतं. माझा हात धरून खेळत बसलं होतं. मी त्याच्याबरोबर कांहींतरी किडबिड बोलत होतें.

सुभाषिणी परत आली तेव्हां मूल म्हणालं, “ आई, हिचा हात बघ. ”

“ मी पूर्वीच पाहिलाय. ” सुभाषिणी हंसून म्हणाली. नंतर ती माझ्याकडे वळून म्हणाली, “ आतां चल. गाडी तयार आहे. नाहीं म्हटलंस तर उचलून घेऊन जाईन. मात्र एक गोष्ट ध्यानांत ठेव—सासूबाईंना बगलेला मारायला हवं ! ”

तिनं मला ओढीतच नेऊन गाडींत बसवलं. पुरोहित भटजींनीं दिलेल्या दोन लुगड्यांपैकीं एक माझ्या अंगावर होतं. दुसरं दोरीवर वाळत होतं तें काढून घ्यायला देखील तिनं मला सवड दिली नाहीं. त्या ऐवजीं सुभाषिणीच्या मुलाला कडेवर घेऊन त्याचे मुके घेत घेत मी चालती झालें.

• •

## ७

★ सुभाषिणीच्या सासूची मर्जी संपादन करायची—अर्थात घरीं पोंहचतांच पहिल्यानं तिला प्रणाम करून तिची पायधूळ घ्यायची. नंतर ती कशी काय आहे तें एकदा पाहून घेतलं. घराच्या गच्चीवर गादी-तक्क्या घेऊन ती पडली होती. एक बाई तिचे पाय चेपीत होती. तिथं काळोख होता. मला वाटलं, गळ्यापर्यंत शाई भरलेली एक बाटली गादीवर पडली आहे. तिचे पिकलेले केंस म्हणजे बाटलीचं टीनचं झांकणसं वाटलं. मला पाहिल्यावर घरवालीनं सुनेला विचारलं, "कोण ही?"

सून म्हणाली, "एक सैंपाकीण शोधीत होतां ना तुम्हीं? ती येतांना घेऊन आलेय."

"कुठं मिळाली?"

"मावशीनं दिली."

"ब्राह्मण की कायस्थ?"

"कायस्थ!"

घरवाली नाक झटकून म्हणाली, "जळ्ळी मेली तुझी मावशी! कायस्थाची बाई घेऊन कसं व्हायचं? हिच्या हातचा भात बामणाला चालेल कसा?"

"रोज तर बामणांना जेवायला घालायचं नाहीं ना?" सून म्हणाली, "चालेल तेवढं चालवून घेऊं, पुढं कुणी बामणी मिळाली तर ठेवून घेऊं! पण त्या मेल्या ब्राह्मणांच्या बायकांचं सोवळंच मोठं. आम्ही सैंपाकघरांत गेलों तर हंडीमडकीं फेंकून देतात—कां? आम्ही काय महार कीं चांभार?"

मनांतल्या मनांत मी सुभाषिणीला शाबासकी दिली. शाईच्या बाटलीला आपल्या बोटाभोंवतीं नाचवायची तिला ताकद होती खास.

घरवाली म्हणाली, "तें खरं आहे ग. या असल्या लोकांची ही मिजास बघून चीड येते. तर मग कांहीं दिवस हिलाच ठेवून घेऊं. पगार किती मागतेय?"

"त्या बाबतींत आमचं कांहीं बोलणं झालं नाहीं." सून म्हणाली.

" आतां काय म्हणावं तुम्हां आजकालच्या पोरींना ? " घरवाली म्हणाली, " नोकर ठेवायला घेऊन येते आणि पगार ठरवला नाहीं म्हणते—" तिनं मला विचारलं, " किती पगार घेणार आहेस ? "

मी म्हटलं, " आपल्या आसऱ्याला आलें आहें. जें द्याल तें घेईन."

घरवाली म्हणाली, " ब्रामणाच्या बाईला थोडे जास्त पैसे द्यावे लागतात-तूं आहेस कायस्थाची. तुला महिना तीन रुपये आणि अन्नवस्त्र देऊं. "

आसरा मिळाला हेंच मला पुरेसं झालं होतं. अर्थात मी कबुली दिली. पगार घ्यायचा याच कल्पनेनं माझ्या काळजाला पीळ पडला होता. मी कबुली दिली.

मला वाटलं होतं, कीं एवढ्यावरच भागलं—पण नाहीं—त्या मोठ्या बाटलींत भरपूर शाई होती. तिनं विचारलं, " तुझं वय काय ग ? काळोखांत दिसत नाहीं नीटसं, पण आवाज अगदीं पोरकट वाटतो. "

मी म्हटलं, " एकूणीस वीस वर्षं. "

" तर मग दुसऱ्या घराचा रस्ता बघ. " घरवाली म्हणाली, " असल्या तरण्याताठ्या पोरी ठेवायच्या नाहींत मला. "

सुभाषिणीनं मधें तोंड घातलं, " तें कां ? तरण्याताठ्यांना काय काम झेंपत नाहीं ? "

" अगदींच वेडी आहेस तूं ! " घरवाली म्हणाली, " असल्या तरण्या पोरी कांहीं बऱ्या नसतात."

" असं कसं म्हणतां ? " सून म्हणाली, " जगांतल्या सगळ्याच तरण्या पोरी काय वाईट असतात ? "

" साऱ्याच नसतील ग ! " घरवाली म्हणाली, " पण अशीं कामधाम करणारीं हलकीं तरणीं माणसं काय चांगलीं असतात ? "

आतां मला रडूं आवरेना. मी रडत रडत तिथून निघालें. शाईची बाटली सुनेला म्हणाली, " मेली निघून गेली वाटतं ! "

" असं वाटतं खरं." सून म्हणाली.

" तर मग जाऊं दे." घरवाली म्हणाली.

सून म्हणाली, “ गृहस्थाच्या घरांतून अशी खाल्ल्याजेवल्याशिवाय काय जाऊं द्यायची तिला ? तिला जेवायला घालीन अन् मग निरोप देईन.” असं म्हणून सुभाषिणी माझ्या मागोमाग आली अन् मला पकडून धरून आपल्या शेजघरांत घेऊन गेली. मी म्हटलं, “ कशाला मला थांबवून घेतां ? पोटाच्या आगीसाठीं म्हणा कीं जिवाच्या राखणीसाठीं म्हणा, असलीं बोलणीं ऐकून घेणं मला कठीण जातंय.”

सुभाषिणी म्हणाली, “ तर मग राहूं नकोस. नुसतीं आजच्या रात्रीपुरती रहा म्हणजे झालं.”

मी कुठं जाणार होतें ? डोळे पुसून घेतले अन् रात्रीपुरतं रहायचं ठरवलं. इकडलीं तिकडलीं बोलणीं झाल्यावर सुभाषिणी म्हणाली, “ इथं रहायचं नाहीं म्हणतेस, मग जाणार आहेस कुठं ? ”

“ गंगेच्या पोटांत ! ”

यावेळीं सुभाषिणीनंही डोळे पुसले. ती म्हणाली, “ गंगेत जीव द्यायला नको कांहीं. जरा स्वस्थ बसून मी काय करतेंय तें पहा. उगीच उतावीळ होऊं नकोस. मी सांगतें तें ऐक—” असें म्हणून तिनं हाराणी नांवाच्या दासीला बोलावलं.

हाराणी खास सुभाषिणीच्या दिमतीला होती. हाराणी आली. जरा जाडजूड, काळीसांवळी, चाळीशी उलटलेली, सदा हंसतमुख, उगीच कारण नसतांना हंसणारी अशी होती ती तिडबिडी हाराणी. सुभाषिणी तिला म्हणाली, “ एकदां त्यांना बोलावून घे पाहूं.”

“ अशा अवेळीं येतील का ते ? ” हाराणी म्हणाली, “ अन् मी कशी बोलावूं त्यांना ? ”

सुभाषिणी डोळे वटारून म्हणाली, “ बोलाव म्हटलं कीं बोलाव. जा पाहूं.”

हाराणी हंसत हंसत निघून गेली. मी सुभाषिणीला विचारलं, “ कुणाला बोलवायला पाठवलं ? तुमच्या पतिराजांना का ? ”

“ तर मग कुणाला ? ” सुभाषिणी म्हणाली, “ अशा रात्रीच्या वेळीं काय दाणेवाल्या वाण्याला बोलवणार आहे ? ”

मी म्हटलं, " तर मग मी जाऊं का इथून ? "

" कांहीं नको जायला. बैस इथंच. "

सुभाषिणीचा नवरा आला. मोठा देखणा पुरुष होता तो. येतांक्षणींच त्यानं विचारलं, " काय हुकूम आहे ? " मला पाहातांच त्यानं विचारलं, " ही कोण ? "

" हिच्याचसाठीं बोलावलं तुम्हाला. " सुभाषिणी म्हणाली, " आमची सैंपाकीणबाई जाणार आहे आपल्या गांवीं. तिच्याजागीं म्हणून मी हिला मावशीकडून आणली होती, पण आईसाहेब कांहीं हिला ठेवून घ्यायला तयार नाहींत. "

" कां तयार नाहींत ? " त्यानं विचारलं.

" तरणीताठी आहे म्हणून. " सुभाषिणी म्हणाली. तिचा नवरा हंसला आणि म्हणाला, " मग आतां मी काय करायला हवं ? "

" हिला ठेवून घ्यायला हवी. "

" कशी ? "

सुभाषिणी त्याच्या जवळ गेली आणि मला ऐकूं न येईल अशा आवाजांत त्याला कांहीं सांगून मग म्हणाली, " माझा हुकूम ! "

तरीपण मला ऐकूं आलं. तिच्या नवऱ्यानंही तशाच आवाजांत, " जशी आज्ञा ! " म्हटलं.

तिनं विचारलं, " केव्हां करणार हें ? "

" जेवायच्या वेळी ! " तो म्हणाला.

तिचा नवरा निघून गेल्यावर मी म्हटलं, " हे कदाचित् मला ठेवून घेतील, पण असलीं कुजकीं बोलणीं ऐकल्यावर मी राहूं कशी ? "

" त्या पुढल्या गोष्टी पुढं ! " सुभाषिणी म्हणाली, " एका दिवसांत तर गंगेचं पाणी आटत नाहीं ! "

रात्रीं नऊ वाजले होते. सुभाषिणीचा नवरा ( त्याचं नांव रमणबाबू ) जेवायला आला. आई जाऊन त्याच्या शेजारीं बसली. मला ओढून घेऊन नेत सुभाषिणी म्हणाली, " काय चाललंय तें बघूं चल. "

आड राहून आम्हीं पहात होतों. ताटांत वाढलेला प्रत्येक जिन्नस रमणबाबू तोंडांत घालून फेंकून देत होता. त्यानं कांहींच खाल्लं नाहीं. त्याच्या आईनं विचारलं, " हें काय रे बाबा ? कांहीं खाल्लं नाहींस ? "

मुलगा म्हणाला, " असला हा सैंपाक भुताखेतांनासुद्धां तोंडीं घालवायचा नाहीं ! या बामणीच्या हातचं अन्न खातां खातां वीट आला आहे मला. उद्यां-पासून आत्याबाईच्या घरीं जाऊन जेवणार आहें. "

तें ऐकतांच घरवालीचं तोंड एवढंसं झालं. ती म्हणाली, " तसं कुठं जायला नको रे बाळ. मी दुसरी सैंपाकीण आणतें. "

बाबू उठले आणि आंचवायला गेले, तें पाहून सुभाषिणी म्हणाली, " आमच्यापायीं आज यांना उपास पडला—पडेना का—काम झालं कीं झालं. "

मी ओशाळून कांहींतरी बोलणार होतें तोंच हाराणी आली आणि सासूबाई बोलावताहेत असं तिला म्हणाली. तो निरोप सांगत असतांना उगीच माझ्याकडे पाहून ती खुदूकन हंसली. मला आतां कळून चुकलं, कीं हंसणं हा तिचा रोग होता.

सुभाषिणी सासूबाईकडे गेली तेव्हां मी दाराआड राहून ऐकूं लागलें.

सासूबाईनीं सुभाषिणीला विचारलं, " ती कायस्थ पोरटी निघून गेली का ग ?"

" नाहीं." सुभाषिणी म्हणाली, " ती जेवली नव्हती म्हणून तिला मी जाऊं दिलं नाहीं."

" कसा काय सैंपाक करते ती ? " सासूबाईनीं विचारलें.

" मला नाहीं माहित." सून म्हणाली.

" आज नको जाऊं म्हणावं तिला." सासूबाई म्हणाली, " तिला म्हणावं उद्यां सैंपाक कर."

" मग ठेवून घ्यायचं का तिला ? " असं म्हणून सुभाषिणी तिथून निघाली ती माझ्यापाशीं आली. तिनं विचारलं, " तुला सैंपाक करायला येतो ना ग ? " मी होय म्हटलं तेव्हां ती म्हणाली, " पण चांगला सैंपाक करतां येतो का ? "

मी म्हटलं, " उद्यां प्रत्यक्षच अनुभव घ्या म्हणजे कळेल."

"संवय नसली तर मला सांग." सुभाषिणी म्हणाली, "मी जवळ बसून ला दाखवून देईन उद्यां."

मी हंसलें. मी म्हटलं, "उद्यांचं उद्यां!"

• •

८

★ दुसऱ्या दिवशीं मी सैंपाक केला. सुभाषिणी मला शिकवायला आली होती असं पाहून मी मिरचीची फोडणी दिली. ती ठसका लागून खोकत उठून गेली. ती जातां जातां मला म्हणाली, "मेले मर एकदांची!"

आधीं मुलंबाळं जेवायला बसलीं. सुभाषिणीचा धाकटा मुलगा आमटी भात गत नसे. पांच वर्षांची तिची मुलगी जेवीत होती तिला सुभाषिणीनं विचारलं, "कसा काय सैंपाक झालाय ग हेमा?"

ती म्हणाली, "छान! अगदीं छान छान!" ती गाणं म्हणूं लागली—

**आली अन्नपूर्णा घरीं**
**आतां जाईल ती माहेरीं**
**रंगीन साडी, हातीं हंडी**
**रांधी गवळयाची पोर—"**

"तुझं राहूंदे गाणं—" तिची आई धमकावून म्हणाली. बिचारी मुलगी उगीच राहिली.

त्यानंतर रमणबाबू जेवायला बसले. मी आड उभी राहून पहात होतें. ुरके मार मारून त्यांनीं सांबारं संपवून टाकलं. घरवाली खूष झाली. रमणबाबूंनं विचारलं, "आज सैंपाक कुणीं केला ग आई?" घरवाली म्हणाली, "एक नवीन बाई आली आहे."

"छान आहे सैंपाक!" असं म्हणून रमणबाबू आंचवायला निघून गेले.

त्यानंतर घरवाले जेवायला बसले. तिथं मला जातां येत नव्हतं. घरवालीच्या हुकुमानुसार भटीण घरमालकांना वाढायला गेली. घरवालीला खडा कुठं

खुपत होता, तें मला आतां कळलं. तरणीताठी सैंपाकीण नको ती एवढ्या-साठींच का ? मी प्रतिज्ञा केली, इथं आहे तोंवर या बाजूला जायचं नाहीं.

मी नंतर बाकीच्या लोकांकडून अंदाज घेतला. घरचे मालक मोठे सज्जन--मोठे निर्मळ चरित्राचे होते—जितेंद्रिय होते, पण त्या शाईच्या बाटलींतलीच शाई काळी होती ना ?

सैंपाकीणबाई आली त्यावेळीं तिला विचारलं, " काय म्हणाले मालक ? त्यांना आवडला का सैंपाक ? "

भटीण भडकून उठली. हातवारे करीत ओरडून म्हणाली, " होय ग बाई, छान रांधतेस ग बाई, छान रांधतेस ! आम्हीसुद्धां सैंपाक करतों—पण म्हातारीला काय या जगांत किंमत आहे ? सैंपाक करायला तरणींताठीं सुंदर माणसं हवींत ना ? "

मी अंदाज केला. घरधन्यांना सैंपाक आवडला खास. म्हातारीला जरा खिजवावं असं वाटलं मला. मी म्हटलं, " तारुण्य हवं अन् सौंदर्यही हवं बरं का भटीण आजी. समोर म्हातारी दिसली तर जेवण कसं रुचेल कुणाला ?"

दांत विचकून खेंकसत म्हातारी म्हणाली, " अन् तुझं हें रूप तरी कुठं राहणार आहे जन्मभर ? किडे पडायचे नाहींत का तोंडाला ? " असं म्हणून ती हांडी उचलायला गेली ती खालीं पडून फुटली. मी म्हटलं, " पाहिलंत भटीणबाई, रूपयौवन नसलं तर हातची हांडी अशी फुटते. "

हातीं कोळसे काढायचा लोखंडी चिमटा घेऊन म्हातारी तशीच तणतणत मला मारायला आली. तिला नीटसं ऐकूं येत नव्हतं. माझं म्हणणं तिला चांगलंसं ऐकूं आलं नसावं. तिनं घाणेरड्या भाषेंत मला उत्तर दिलं. मलाही जरा गंमत करावीशी वाटली. मी म्हटलं, " थांबा आक्काबाई ! तो चिमटा हातांतच राहूं दे. " तितक्यांत सुभाषिणी तिथं आली. म्हातारी रागांत होती तिची नजर तिच्याकडे गेली नाहीं. चिमटा धरून माझ्या अंगावर धांवून येत ती म्हणाली, " हरामजादे, तोंडाला येईल तें बोलतेस का ? हाताला चिमटा घेईन म्हणतेस ? पागल झालेंय का मी ? "

सुभाषिणींनं तें ऐकलं आणि ती तिला दरडावून म्हणाली, " मी आणली आहे तिला ! तिला हरामजादी म्हणणारी तूं कोण ? आतांच्या आतां घराबाहेर नीघ. "

म्हातारी घाबरली. हातांतला चिमटा फेंकून देऊन रडकुंडीला येऊन म्हणाली, "नाहीं हो बाई नाहीं—असं काय म्हणतां? मी कधीं कुणाला हरामजादी म्हटलं? असं मी कसं बोलेन कुणाला? अगदीं थक्क केलंत तुम्ही!—" तें ऐकून सुभाषिणी खुदखुदून हंसूं लागली. म्हातारीनं भोकाड पसरून रडायला सुरवात केली. ती म्हणाली, "हरामजादा म्हणेल ती नरकांत जाईल—"

(मी म्हटलं, "गेलीस तर ब्याद गेली!")

"यमाच्या घरीं जाईन मी."

(मी म्हटलं, "हें काय आक्काबाई, इतक्या लवकर? छे छे दोन दिवस थांबा ना!")

"नरकांतसुद्धां जागा मिळायची नाहीं मला!"

आतां मी मोठ्यानं म्हटलं, "असं म्हणूं नका आक्काबाई! तुमच्या हातचं जेवण खायला मिळालं नाहीं तर मग नरकांत गेल्याचं सार्थक काय?"

म्हातारी रडत रडत सुभाषिणीला म्हणाली, "जें तोंडाला येईल तें ही बोलते आहे! तुम्ही नुसतं ऐकून घेतां. तुम्ही कांहींच बोलत नाहीं? मी जातें आतां तुमच्या सासूबाईकडे."

"तर मग आतां मीही सांगतें," सुभाषिणी म्हणाली, "तुम्ही हिला हरामजादी म्हटलंत."

तेव्हां म्हातारीनं आपलंच थोबाड फोडून घ्यायला सुरवात केली, "मी कधीं हरामजादी म्हटलं? (एक थप्पड)—मी हरामजादी म्हटलं होय? (दुसरी थप्पड)—मी केव्हां हरामजादी म्हटलं? (तिसरी थप्पड)—" इति समाप्त.

आतां आम्ही म्हातारीला समजवायची सुरवात केली. पहिल्यानं मी म्हणालें, "हें पहा बाईसाहेब, त्यांनीं हरामजादी म्हटलेलं केव्हां ऐकलं तुम्ही? केव्हां म्हटलं यांनीं? मला तरी ऐकूं आलं नाहीं."

तेव्हां म्हातारी म्हणाली, "आतां तुम्हीच ऐका सूनबाई. असले शब्द येतील का कधीं माझ्या तोंडावाटे?" "खरं हो खरं!" सुभाषिणी म्हणाली,

" बाहेर कुणीतरी तसं म्हटलं तें माझ्या कानीं आलं वाटतं ! एवढ्या या भटीणबाई कसं म्हणतील असं ? काल यांचा सैंपाक चाखला होतास ? या उभ्या कलकत्त्यांत असा सैंपाक करतां येतोय का कुणाला ? "

" आतां ऐक तूं ! ऐकलंस ? " म्हातारी माझ्याकडे पाहून म्हणाली.

" तेंच तर म्हणतात सारे लोक, " मी म्हटलं, " कीं असला सैंपाक उभ्या जन्मांत आम्ही कधीं चाखला नव्हता ! " म्हातारी तोंडभर हंसली आणि म्हणाली, " तुम्ही लोक म्हणणारच तसं. गृहस्थाघरची मुलगी तूं. सैंपाकाची पारख तुला नसायची तर कुणाला ? असल्या मुलीला का मी कधीं गाळी देईन ? खास तूं आहेस थोरामोठ्याघरची मुलगी ! कांहीं काळजी करूं नकोस. अगदीं छान सैंपाक करायला तुला शिकवीन तेव्हांच मी इथून जाईन ! "

अशा रीतीनं म्हातारीबरोबर आमचा तह झाला. गेले कित्येक दिवस मी रडून काढले होते. फारा दिवसांनीं आज मी पहिल्यानंच हंसलें. हें हंसणं होतं गरिबाच्या निधीसारखं—फार गोड गोड लागलं तें. म्हणूनच हा म्हातारीचा इतिहास मी इतक्या विस्तारानं लिहिला. तें माझं हंसणं मी जन्मभर विसरणार नाहीं. त्यावेळच्या या हंसण्याचा तो आनंद यापुढं लाभणं अशक्य होतं.

त्यानंतर घरवाली जेवायला बसली. मी तिला सारे जिन्नस आग्रह कर करून वाढले. थेरडीनं बकाबक खाऊन टाकले. शेवटीं म्हणाली, " एकूण जेवण करतेस छान ! कुठं ग शिकलीस हें ? "

" माझ्या बापाच्या घरीं." मी म्हटलें.

" कुठं आहे ग तुझ्या बापाचं घर ? " तिनं विचारलं.

मी एक खोटंच गांवाचं नांव सांगितलं. तेव्हां ती म्हणाली, " हा तर थोरामोठ्या घरचा सैंपाक दिसतोय मला. बराच मोठा माणूस होता का तुझा बाप ? "

" होता खरा !—"

" मग तूं सैंपाकीण म्हणून आलीस कशाला ? "

" प्रसंग येत असतो माणसावर केव्हां केव्हां ! " मी म्हटलं.

" तर मग रहा." घरवाली म्हणाली, " आनंदांत रहा. थोरामोठ्यांची मुलगी तूं, तशीच वागवूं आम्ही तुला."

जेवून उठल्यावर सुभाषिणीला बोलावून ती म्हणाली, " ऐकलंस का ग सूनबाई, हिला कुणी उणं अधिक बोलायचं नाहीं म्हणावं!—तूं नाहींच बोलायचीस—तूं नव्हेसच तशा माणसांतली."

सुभाषिणीचा मुलगा तिथंच बसलेला होता तो म्हणाला, "मी अदीत बोलन."

" बोल पाहूं, " मी म्हटलं.

तो म्हणाला, " ज्या-ज्या-चल–आन्थिन् ताय आई ? "

" आणखिन् तुझी सासू " सुभाषिणी म्हणाली.

" तोन तोन छाछू ? "

सुभाषिणीची मुलगी हेमा माझ्याकडे बोट करून म्हणाली, " ही तुझी सासू ! "

तेव्हां मुलगा म्हणूं लागला, " तुनुदिनी छाछु ! तुनुदिनी छाछु ! ! "

सुभाषिणी माझ्याबरोबर कसलं ना कसलं तरी नातं जोडायची संधीच पहात होती. मुलाच्या तोंडचे ते बोल ऐकून ती म्हणाली, " तर मग आजपासून तूं माझी विहीण झालीस बरं का ! "

त्यानंतर सुभाषिणी जेवायला बसली. मी तिच्याजवळ बसून तिला वाढूं लागलें. जेवतां जेवतां तिनं विचारलं, " तुझीं किती लग्नं झालीं आहेत ग विहीणबाई ? "

तिची खोंच मला कळली. मी म्हटलं, " कां ? सैंपाक द्रौपदीनं केला असं का वाटलं ? "

" ओ यस् ! " सुभाषिणी म्हणाली.

" बिची पांडव फर्स्टक्लास बबर्जी होती ! ठीक ! आतां तरी आमच्या सासूबाईची ओळख पटली ? "

" फारशी नाहीं, " मी म्हटलं, " दरिद्री माणूस अन् मोठ्या माणसांघरच्या बायका यांच्यांत थोडासा फरक हा असतोच. "

सुभाषिणी हंसत सुटली. ती म्हणाली, "आतां मर मेले एकदांची ! हेंच का कळलं तुला ? तूं थोरा मोठ्या घरची मुलगी, म्हणून का सासूबाईनीं तुझं एवढं कौतुक केलं ? "

" तर मग कां ? " मी विचारलं.

सुभाषिणी म्हणाली, " अग, तिचा मुलगा आज पोटभर जेवला म्हणून एवढं कौतुक होतंय तुझं ! असंच जर चालू ठेवलंस तर थोडक्याच वेळांत तुझा पगार दुप्पट होईल. "

" मला नको आहे तो पगार ! " मी म्हटलं, " मी नको म्हटलं तर उगीच कांहींतरी भानगड उपस्थित होईल एवढ्यासाठींच मी हात पुढं करीन अन् तो तुमच्याकडेच देईन. कुणातरी गरिबाला देऊन टाका तो. मला आसरा मिळाला एवढंच माझ्यालेखीं पुष्कळ झालंय ! "

● ●

## ९

★ मला आसरा मिळाला. आणखीही एक अमोल ठेवा मिळाला मला—एक जिवाभावाची मैत्रीण. सुभाषिणी दिवसेंदिवस माझ्यावर अंतरापासून प्रेम करीत होती असं मला दिसून येऊं लागलं. अगदीं एकाद्या पाठच्या बहिणीसारखी मला वागवीत होती ती. तिची ती वागणूक पाहून नोकर-चाकरसुद्धां मला मान देत होते. इकडे सैंपाकही सुखासमाधानानं चालला होता. ती म्हातारी सैंपाकीण—तिला म्हणत सोनूची आई—ती कांहीं आपल्या गांवी गेली नाहीं. तिला वाटलं, आपण गांवीं गेलों तर पुन्हां नोकरी मिळायची नाहीं अन् मलाच कायम करून टाकतील, म्हणून रोज कांहीं तरी कारणं काढून तिनं घरीं जायचं टाळलं. सुभाषिणीच्या शिफारशीमुळं आम्ही दोघीही राहून गेलों. कुमुदिनी थोरामोठ्याघरची मुलगी—एवढा सारा सैंपाक करणं तिला झेपायचं नाहीं—अन् सोनूची आई म्हातारी माणूस—ती तरी कुठं जाणार ?—असं म्हणून तिनं सासूची समजूत घातली. सासू म्हणाली, " दोघींनाहीं कसं ठेवायचं ? इतके पैसे आणायचे कुठून ? "

सून म्हणाली, " तर मग एकीलाच जर ठेवायची तर सोनूच्याच आईला ठेवा. कुमूला कांहीं एवढं काम झेपायचं नाहीं. "

" नाहीं ग बाई नाहीं. " सासू म्हणाली, " सोनूच्या आईच्या हातचा सैंपाक का माझ्या मुलाच्या घशांत उतरणार ! तर मग राहूं देत दोघीही. "

माझ्यासाठीं सुभाषिणीनं ही वलती लढवली. ती सासूला कळीच्या बाहुली सारखी नाचवी. रमणची बायको होती ना ती ? अन् रमणच्या बायकोचा शब्द खालीं पाडायची कुणाची छाती होती ? शिवाय सुभाषिणीची बुद्धी जितकी तिखट, तितकाच तिचा स्वभाव गोड होता. असली मायाळू मैत्रीण लाभल्यामुळं माझे ते कष्टाचे दिवसदेखील सुखांत गेले.

मासे अन् सागोती हे जिन्नस करायचं काम मी करीत असें. क्वचित एकादं सुंदरसं सांबारं मी रांधीत असें. बाकीच्या वेळीं सुभाषिणीबरोबर गप्पागोष्टी करायच्या, तिच्या मुलांचं कोडकौतुक करायचं, एकाद्या वेळीं खुद्द घरवाल्या-बाईबरोबरही थोडीशी खुशामत करावी लागे.

परंतु शेवटीं मी बरीच घोटाळ्यांत पडलें. आपण तरुण आहों असा घर-वालीचा समज झाला होता. कसल्यातरी प्रकृतिदोषामुळं आपले कांहीं केस पिकले आहेत, तेवढे काढून टाकले कीं आपलं तारुण्य शाबीत होईल, असं तिला वाटे, म्हणून ती केव्हांना केव्हां आपल्या केसांतले पांढरे केंस उपटून घेत असे. एके दिवशीं तिनं या कामासाठीं मला अडकवलं. मी भराभर केंस काढूं लागलें. दुरून पहात असलेल्या सुभाषिणीनं मला खूण करून बोलावलं आणि म्हटलं, " हें काय चालवलं आहेस ? सासूबाईंना संन्यास का देणार आहेस ? "

मी म्हटलं, " हें पाप केव्हां तरी निस्तरलंच पाहिजे. "

ती म्हणाली, " असं कांहीं केलंस अन् त्या चिडल्या तर जाणार आहेस कुठं ? "

मी म्हटलं, " पण तुमच्या सासूबाई हट्टच धरून बसतात ना ? "

" तें खरं, " सुभाषिणी म्हणाली, " पण त्यांना सांगायचं कीं पिकलेले कैंस कांहीं फारसे नाहींत अन् निघून यायचं. "

मी हंसलें आणि म्हटलं, " असा दिवसा दरवडा कसा घालायचा उघड्या डोळ्यांनीं ? मी काय काळीदिघीची डाकू आहें ? "

" काळीदिघीची डाकूगिरी कसली ? " तिनं विचारलं. तिच्याबरोबर बोलतांना मला विसर पडला होता. बेसावधपणें तो उल्लेख तोंडांतून गेला. मी तिथंच जीभ आवरली अन् म्हटलं, " ती गोष्ट मग सांगेन केव्हांतरी. "

सुभाषिणी म्हणाली, " मी सांगितलं तसं एकदां सांग त्यांना. माझं एकदां ऐकून पहा." मी हंसत हंसत घरवालीपाशी गेलें अन् पुन्हां पांढरे केंस उपटूं लागलें. एकदोन केंस उपटून काढल्यावर मी म्हटलं, " तसे विशेषसे पांढरे केंस नाहीं दिसत. एकदोन राहिलेत ते उद्यां काढीन. "

ती तोंडभर हंसली आणि म्हणाली, " अन् या मेल्या म्हणताहेत कीं माझे सारेच केंस पिकले आहेत म्हणून ! "

त्या दिवशीं माझं खूप कौतुक झालं. रोजरोज पांढरे केंस निवडून काढायची यातायात टळण्यासाठीं एक योजना मी मनांत ठरवली. नुकतेच पगाराचे पैसे मिळाले होते. त्यांतला एक रुपया हाराणीच्या हातीं देऊन मी म्हटलं, " कुणाकडून तरी एक कलपाची बाटली आणून दे मला. "

हाराणीला हंसूं कोसळलं. तें थांबल्यावर ती म्हणाली, " कलप कशाला ? कुणाच्या केंसासाठीं ?

" सैंपाकीणबाईच्या. " मी म्हटलं.

आतां तर हाराणीनं हंसतां हंसतां बैठकच मारली. तितक्यांत सैंपाकीणबाई तिथं आल्या, तें पाहून तिनं हंसं थांबण्यासाठीं तोंडात पदराचा बोळा दिला. सैंपाकीणबाई म्हणाल्या, " असं हंसायला काय झालं ? "

" दुसरं येतंय काय तिला ? " मी म्हटलं, " मी म्हटलं, सैंपाकीणबाईच्या केंसाला कलप दिला तर कसं दिसेल ? म्हणून हंसतेय ती. "

" मग त्यांत एवढं हंसायला काय झालं, अन् बिघडलं काय कलप लावला म्हणून ? चांदीचे केंस, चांदीचे केंस म्हणून सारीं म्हणतात, ती तरी आफत चुकेल ! "

म्हातारीला कलप हवा आहे असं दिसून आलं तेव्हां मी म्हटलं, " ठीक आहे, मी आणून देतें कलप. "

म्हातारी म्हणाली, " देच तर आणून. दीर्घायू हो पोरी. सोन्याचे दागिने पडोत तुझ्या अंगावर. "

हाराणीनं एक कलपाची बाटली आणून दिली. मी ती घेऊन घरवालीचे पांढरे केंस काढायला गेलें. हातांत तें काय म्हणून तिनं विचारलं तेव्हां मी

म्हटलं, “ एक अर्क आहे. तें डोईला लावलं कीं पांढरे केंस गळून पडतात अन् काळे तेवढे शिल्लक रहातात. ”

घरवाली म्हणाली, “ खरं कीं काय ? मी कधीं ऐकलं नव्हतं. बरं बरं, लाव तरी एकदां. कलपबिलप लावूं नकोस हो. ”

मी तिच्या केंसांना तो कलप व्यवस्थितपणें लावला. आतां पांढरें केंस राहिले नाहींत असं सांगून मी निघून गेलें. थोड्या वेळांत घरवालीचे सगळे केंस काळे झाल्याचं दिसून आलं. दुर्दैवानं त्याचवेळीं खोली झाडायला हाराणी आली होती. हातांतली केरसुणी फेंकून हसूं आवरण्यासाठीं तोंडांत पदराचा बोळा कोंबीत ती माजघरांत निघून गेली. तिथं सैंपाकीणबाई होत्या. तिनं तिला काय झालं म्हणून विचारलं. हसूं अनावर झाल्यामुळं तिला बोलतां येत नव्हतं. तिनं गच्चीकडे बोट करून तसंच हंसत हंसत खुणेनं डोकं दाखवलं. सोनूची आई घोटाळ्यांत पडली. ती वर जाऊन पहाते तों मालकिणीचे सारे केंस काळे झाले होते. तें पाहून ती एकदम रडूं लागली अन् म्हणाली, “ अरे देवा ! हें काय झालं हो ! तुमचे सारे केंस एकदम काळे कसे झाले ? कुणी औषध दिलं हें ? ”

इतक्यांत सुभाषिणीनंही तें पाहिलं आणि ती माझ्याकडे येऊन हंसत हंसत म्हणाली, “ मेले काळतोंडे ! काय केलंस हें ? सासूबाईंच्या केंसाला कलप लावलास ? ” मी होय म्हटलं तेव्हां ती म्हणाली, “ आग लागली तुझ्या तोंडाला ती ! आतां काय होईल कोण जाणे ! ”

मी म्हटलं, “ अगदीं स्वस्थ बसून गंमत पहा. ”

तितक्यांत खुद्द मालकीणबाईंचं मला बोलावणं आलं. त्यांनीं विचारलं, “ काय ग कुमे, तूं कलप लावलास का माझ्या माथ्याला ? ”

बाईंचा चेहरा खुषींत आल्यासारखा दिसत होता असं पाहून मी म्हटलं, “ कोण म्हणतंय असं ? ”

बाई म्हणाल्या, “ ही सोनूची आई म्हणतेय. ”

मी म्हटलं, “ सोनूच्या आईला काय कळतंय ? हा कलप नव्हे, औषध आहे तें. ”

“ एकंदरींत बरं दिसतंय तुझं औषध. जरा आरसा घेऊन ये पाहूं. ” मी

आरसा आणून दिला. आरशांत तोंड पाहिल्यावर बाई म्हणाल्या, "अगबाई ! सारे केंस काळे झालेत कीं ! अग गाढवी, लोकं म्हणतील कीं कलप केलाय."

बाई तोंडभर हंसूं लागल्या.

त्या दिवशीं संध्याकाळीं त्यांनीं माझ्या सैंपाकाची खूप तारीख केली अन् माझा पगार वाढवल्याचं जाहीर केलं. त्या म्हणाल्या, "या नुसत्या कांचेच्या बांगड्या हातांत घालतेस पोरी, त्या पाहवत नाहींत माझ्यानं—" असं म्हणून त्यांनीं आपण वापरीत नसलेल्या सोन्याच्या बांगड्यांचा जोड मला बक्षिस दिला. तो घ्यायचा माझ्या जिवावर आलं. डोळे भरून आले होते, तरीही मला 'नको' म्हणायला सवडच दिली नाहीं त्यांनीं.

थोड्या वेळांत सोनूच्या आईनं मला गांठलं. ती म्हणाली, "त्यांतलं औषध आहे का ग तुझ्याकडे ?"

मी म्हटलं, "कुठलं औषध ! नवऱ्याला वश करण्यासाठीं त्या शेजारच्या भटणीला दिलं होतं तें ?"

म्हातारी म्हणाली, "चल ! दूर हो. पुरे झाला पोरकटपणा. आतां कुठं आहे तसं कोण ?"

"नाहीं ? असं हो काय म्हणतां ? एकसुद्धां नाहीं ?"

"तुमच्यांत काय पांच नवरे करतात होय ?" म्हातारी चिडून म्हणाली.

"त्याशिवाय का असा सैंपाक करतां येतो मला ?" मी म्हटलं, "द्रौपदी असल्याशिवाय का असा सैंपाक साधतो ? पांच नवरे करून तर पहा आजिबाई, तुमच्या हातचा सैंपाक पोटांत जातांच झीट येऊन पडतील लोक."

म्हातारीनं एक मोठा सुस्कारा सोडला. ती म्हणाली, "उभ्या जन्मांत एक-सुद्धां लाभला नाहीं, ते पांच कुठून आणूं ? मुसलमानांचं आपलं बरं. पाप आहे काय तें आम्हां हिंदू बायांचं. अन् तेंही व्हायचं कसं ? हे सारे चंदेरी केंस !—म्हणून म्हणत होतें, तें केंस काळे व्हायचं तुझं औषध—"

"तें म्हणतां होय ?" मी म्हटलं, "आहे तर !"

कलपाची बाटली मी म्हातारीच्या हवालीं केली. म्हातारीनं झोंपायच्यापूर्वी तो कलप कसाबसा केंसाला चोपडला. थोड्यांना लागला तर थोडे तसेच राहिले. त्यांतला कांहीं कलप तोंडावर ओघळला. सकाळीं जेव्हां ती बाहेर पडली

तेव्हां तिचे केंस पांचरंगी मांजराच्या केसांसारखे झाले होते. कांहीं काळे, कांहीं तपकिरी, तर कांहीं पांढरेच होते. अन् तिचं तोंड झालं होतं कांहींसं वांदरासारखं अन् कांहींसं मांजरासारखं. तिला पहातांक्षणींच वाड्यांतलीं सारींच माणसं हंसत सुटलीं. जो तिला पाही, तो हंसून काष्ठ होई. हाराणी तर हंसतां हसतां दोन्ही हातांनीं पोट दाबून धरून जमिनीवरच कोसळली. ती सुभाषिणीला म्हणाली, " मला आतां मोकळं करा या नोकरींतून. असल्या हंसऱ्या घरांत रहाणं आतां झेपायचं नाहीं मला. एक दिवस दम अटकून मरेन उगीच. "

मी सर्वांना बजावलं होतं त्याला अनुसरून कुणीच म्हातारीला कांहीं बोललं नाहीं. तसल्याच सोंगानं ती घरभर वावरत होती. कुणी हंसलं तर ती विचारी, " काय झालं ग हंसायला ? "

कुणी सरळ उत्तर देत नसे. एकीनं म्हटलं, " काल रात्रीं कोठींत कुणी हांडींतला भात खाऊन गेलं. तें काम तुम्हीच केलं असं म्हणतात कोण कोण. म्हातारपणीं काय ही दुर्बुद्धी ? "

तें ऐकतांच म्हातारीनं तोंडाला येईल त्या शिव्या द्यायला सुरवात केली. प्रत्येकाचे बेचाळीस पूर्वज काढले. त्यांच्या नवऱ्याला आणि मुलाबाळांना नेऊन जाण्यासाठीं यमाला हांक मारली, पण तिची ही हांक कांहीं यमराजांच्या कानीं गेली नाहीं. तिच्या तोंडच्या शिव्याशापांचा कांहींच परिणाम झाला नाहीं.

म्हातारीचा रंगीत चेहरा तसाच राहिला होता. ती तशीच रमणबाबूंना वाढायला गेली. तिला पहातांच रमणबाबूंना हंसतां हंसतां ठसका लागला आणि त्यांचं जेवण तसंच राहिलं. रमणबाबूंच्या वडिलांनीं तर ती समोर दिसतांच तिच्या अंगावर ओरडून तिला हांकलून दिलं, असं कुणी मला सांगितलं. शेवटीं सुभाषिणीला तिची दया आली. तिनं म्हातारीला म्हटलं, " माझ्या खोलींत मोठा आरसा आहे त्यांत एकदां तोंड पाहून या बाई. "

आरशांत तोंड पहातांच म्हातारीनं भोकांड पसरलं अन् मला शिव्याशाप द्यायला सुरवात केली. मी तिला समजावून सांगितलं, कीं मी औषध लावायला सांगितलं होतं तें केसांना, तोंडाला नव्हे.

म्हातारीची समजूत पडली नाहीं. ती पुन्हां पुन्हां माझी खबर घेण्यासाठीं यमाला हांक मारूं लागली. शेवटीं माझ्या तीन वर्षांच्या जांवयानं कपडे वाळत

घालायची एक काठी आणून म्हातारीच्या पाठींत घातली. तो म्हणाला, "माजी छाछू!"

त्यासरशीं म्हातारी मोठमोठ्यानं टाहो फोडून रडूं लागली. ती रडत होती अन् माझा जांवई टाळ्या पिटून नाचत म्हणत होता, "माजी छाछू! माजी छाछू!" मी त्याला उचलून कडेवर घेतला अन् त्याचा एक मुका घेतला तेव्हां तो थांबला.



## १०

★ त्या दिवशीं दुपारीं सुभाषिणी माझा हात धरून मला आपल्या खोलींत घेऊन गेली. ती म्हणाली, "काळीदिघीची दरवडे-खोरीची हकीगत मला सांगेन म्हटलं होतंस; पण अजून सांगितली नाहींस. आज आतां एकदां सांगून टाक."

मी बराच वेळ विचारांत पडलें. शेवटीं मी म्हटलं, "माझ्या दुर्दैवाची कथा आहे ती. माझा बाप बडा माणूस आहे म्हणून मी तुम्हाला सांगितलंच होतं. तुमचे सासरेही बडे माणूस आहेत खरे; पण ते कांहीं माझ्या बापाच्या तोडीला यायचे नाहींत. माझा बाप अजून हयात आहे. त्याची अपार संपत्तीही तशीच आहे—आजही त्यांच्या दारांत हत्ती झुलताहेत. आज दुसऱ्याचा सैंपाक करायचं माझ्या नशिबीं आलंय त्याला कारण काळीदिघीची ती दरवडेखोरी—" असं म्हणून मी थांबलें. तीही गपचिप बसली होती.

थोड्या वेळानं ती म्हणाली, "तें सांगायला तुला जर कठीण जात असेल तर सांगूं नकोस. असं कांहीं होतं हें माहित नव्हतं म्हणूनच मी विचारीत होतें."

"मी सारं कांहीं सांगून टाकणार आहें." मी म्हणालें, "एवढी माया करतां तुम्ही माझ्यावर, एवढं उपकारी करून ठेवलं आहे मला, त्या तुम्हाला सारं कांहीं सांगायला मला कठीण जायचं नाहीं—"

मी बापाचं नांव सांगितलं नाहीं, गांवाचं नांव सांगितलं नाहीं, नवऱ्याचं अन् सासऱ्याचं जसं नांव सांगितलं नाहीं, तसंच गांवही सांगितलं नाहीं. बाकी सारी हकिकत—तिची भेट होईपर्यंतची सारी हकिकत मी तिला सांगून टाकली.

ती ऐकतां ऐकतां सुभाषिणीचे डोळे भरून आले. मलाही बोलतांना मधून मधून हुंदके येत होते.

त्या दिवशीं तेवढंच झालं.

दुसरे दिवशीं सुभाषिणीनं पुन्हा मला आपल्या खोलींत नेलं आणि विचारलं, " आतां बापाचं नांव सांगायलाच हवंस तूं. "

मी तें सांगितलं.

" अन् ते रहातात कुठं तेंही सांगायला हवं आतां. "

मी तेंही सांगितलं.

" आतां पोष्टाचं नांव सांग. " ती म्हणाली.

" पोष्टाचं नांव पोष्ट ! दुसरं काय ? " मी म्हटलं.

" चल काळतोंडे ! " ती म्हणाली, " तें गांव कोणत्या पोष्टाखालीं आहे, त्या पोष्टाच्या गांवाचं नांव सांग. "

" तें कांहीं मला माहित नाहीं. " मी म्हटलं.

" ज्या गांवीं तुमचं घर आहे त्याच गांवांत पोष्ट आहे कीं दुसऱ्या गांवांत ? "

" तेंही मला माहित नाहीं. " मी म्हटलं.

सुभाषिणी थोडीशी खिन्न झाली. त्यावर विशेष कांहीं बोलली नाहीं.

पुन्हा दुसऱ्या दिवशीं तिनें मला बाजूला घेऊन म्हटलं, " थोरा मोठ्या घरची मुलगी तूं, असे किती दिवस सैंपाक करीत काढणार आहेस ? तूं गेलीस तर मला रडूं येईल—पण माझ्या सुखासाठीं तुझ्या सुखाच्या आड येण्याइतकी मी कांहीं पापी नाहीं. म्हणून आम्ही बेत केला आहे--"

" आम्ही म्हणजे कोण कोण ? " मी तिला मधेंच विचारलं.

" मी अन् र-बाबू " ती म्हणाली.

र-बाबू म्हणजे रमण बाबू. माझ्यापाशीं बोलतांना ती नवऱ्याच्या नांवाचा असाच उल्लेख करीत असे. ती म्हणाली, " आम्ही असा बेत केलाय, कीं तुझ्या बापाला पत्र लिहायचं कीं तूं इथं आहेस—म्हणूनच काल मी पोष्टाचं नांव विचारीत होतें. "

" म्हणजे तुम्ही ही सारी हकिकत त्यांना सांगितली होय ? "

" सांगितली तर, " ती म्हणाली, " त्यांत काय बिघडलं ? "

" कांहीं बिघडलं नाहीं-" मी म्हटलं, " ठीक ! बरं मग पुढं ? "

" महेशपूरला पोष्ट ऑफिस असेल अशी कल्पना करून पत्र लिहून टाकलं."

" म्हणजे पत्र लिहूनसुद्धां पाठवलं ? "

ती ' होय ' म्हणाली.

माझा आनंद गगनांत मावेना. मी एक एक दिवस मोजित होतें, उत्तर केव्हां येईल याचा अंदाज करीत होतें, पण पत्राचं उत्तर आलं नाहीं. माझं नशिबच दुर्धर—महेशपूरला पोष्ट ऑफिसं उघडलं गेलं नव्हतं. राजाची राजकन्या मी—त्या गांवीं पोष्ट ऑफिस नव्हतं, याचा पत्ता त्यावेळीं मला होता कुठं ? कलकत्त्याच्या मोठ्या पोष्टांत तें परत आलेलं पत्र उघडलं गेलं आणि तें आमच्याकडे परत करण्यांत आलं. पुन्हां मी रडायला सुरवात केली. र–बाबू कसले वस्ताद ! दातीं धरलेलं त्यांनीं सोडलं नाहीं. पुन्हां सुभाषिणीनं येऊन मला विचारलं, " आतां नवऱ्याचं नांव सांगायला हवंस। "

मला थोडं बहूत लिहितां येत होतं. मी नवऱ्याचं नांव लिहून दिलं. पुन्हां तिनं विचारलं, " अन् सासऱ्याचं नांव ? " तेंही लिहून दिलं.

" गांवाचं नांव ? "

तेंही लिहून दिलं.

" पोष्टाचं नांव ? "

मी म्हटलं, " तें कुठं मला माहित आहे ? "

रमणबाबूंनीं तिकडेही पत्र लिहिल्याचं मला कळलं, पण तिकडूनही उत्तर आलं नाहीं. मी खचल्यासारखी झालें. आशाळभूतपणें मी ' पत्र लिहूं नका ' असं म्हटलं नाहीं. पण आतां मला आठवलं, मला दरवडेखोरांनी पळवून नेलं होतं. मी पतित झालें होतें. माझी जात बुडाली होती. सासरा अगर नवरा यांना असंच वाटणार होतं. त्यांना पत्र लिहिलं तें बरं केलं नाहीं असं मला वाटलं. तें मी सुभाषिणीला बोलून दाखवलं. त्यावर सुभाषिणी कांहीं बोलली नाहीं.

मला कळून चुकलं, कीं यापुढं मला कुणाचाच आधार नाहीं. मी बिछाना धरला.

• •

## ११

★ एके दिवशीं सकाळींच उठलें आणि पहातें तो घरांत मारे गडबड उडाली होती. रमणबाबू वकील होते. त्यांचे एक बडे अशील होते. दोन दिवसापूर्वी ते कलकत्त्याला आले होते. रमणबाबू आणि त्यांचे वडील दोघेही त्या अशीलाच्या घरीं सारख्या खेपा घालीत होते. कांहीं देवघेवीच्या व्यवहाराचा बराचसा संबंध होता म्हणूनच रमणबाबूचे वडील देखील त्यांच्याकडे जात होते. आज दुपारीं त्यांना जेवायला बोलवलं होतं असं मला कळलं. म्हणूनच चार ठळकसे जिन्नस करायची गडबड सुरू झाली होती. सैंपाक पाहुण्यांना रुचेलसा उत्तम झाला पाहिजे होता म्हणून तो सारा भार माझ्यावर टाकला गेला. मी शक्य तितकी काळजी घेऊन चार जिन्नस तयार केले. जेवायला बसायची व्यवस्था माजघरांत केली होती. रामरामबाबू, रमणबाबू आणि निमंत्रित पाहुणे जेवायला बसले. वाढायचं काम होतं म्हातारीचं—बाहेरच्या लोकांना मी कधीं वाढायला जात नसें. म्हातारी वाढीत होती—मी सैंपाक घरांत होतें. इतक्यांत कसली तरी गडबड झाल्याचं ऐकू आलं. रमणबाबू म्हातारीच्या अंगावर ओरडत होते. एकजण सैंपाकघरांत आली आणि म्हणाली, " मेलीनं जाणून बुजून अपमान केला पाहुण्यांचा. "

" काय झालं ? " मी विचारलं.

ती म्हणाली, " दादाबाबूंच्या पानावर वरण वाढायला म्हातारी गेली—त्यावेळीं त्यांनीं उहुं उहुं म्हणून हात पुढं केला—म्हातारीनं सारं वरण त्यांच्या हातावर ओतलं. "

त्याचवेळीं मी ऐकलं होतं—रमणबाबू म्हातारीला दरडावून म्हणत होते, " वाढतां येत नाहीं तर येतेस कशाला ? दुसरं कोण नव्हतं कां तिथं ? "

रामरामबाबू म्हणाले, " हें तुझं काम नव्हे ! कुमीला पाठव वाढायला. "

घरवाली तिथं नव्हती, तेव्हां 'नको' म्हणणार होतं कोण ? इकडे खुद्द बड्या मालकांचा हुकूम—नाहीं म्हणायचं कसं ? वाढायला गेलें तर घरवाली मला रागें भरली असती. करायचं कसं ? सैंपाकीण बाईला समजावून सांगितलं—म्हटलं, " जरा नीट लक्ष देऊन वाढा ना त्यांना ! "

पण ती घाबरून जायलाच तयार होईना. अथात मी हात धुतले, तोंड पुसून घेतलं, लुगडं नीट सरसावून घेतलं आणि पदर माथ्यावर चांगला पुढं ओढून घेऊन वाढायला गेलें.

असं भलतंच कांहीं होईल अशी कल्पना होती कुणाला ? मी मोठी शहाणी आहें अशी मला घमेंड होती—पण सुभाषिणी मला एका बाजारांत विकील अन् दुसऱ्या बाजारांत पुन्हां विकत घेईल याची कल्पना मला कुठं होती ?

हातभर बुरखा पुढं ओढला म्हणून स्त्रीस्वभाव कांहीं झांकला जात नाहीं. बुरख्याच्या आडून निमंत्रितबाबूंना एकदां मी पाहून घेतलं.

त्यांचं वय तिशीच्या आसपास असावं—वर्ण चांगला गोरा—प्रकृतीही चांगली सुदृढ होती. कुणाही स्त्रीची नजर सहज त्यांच्यावर खिळली असती. विजेचा झटका बसल्यासारखी मी चमकलें. थोडासा विचुकपणा आला माझ्या ठायीं. सागोतीचं भांडं हातीं घेऊन तशीच क्षणभर थांबलें—बुरख्यांतून त्यांच्याकडे बघत होतें तोंच त्यांनीं वर नजर करून माझ्याकडे पाहिलं. बुरख्या आडून मी त्यांच्याकडे पहातें आहे हें त्यांच्या ध्यानीं आलं. मी कांहीं कळून सवरून इच्छापूर्वक त्यांच्यावर कटाक्ष हाणायला गेलें नव्हतें. तसली पापीवृत्ती माझ्या हृदयांत नव्हती. साप फणा उभारतो तो कांहीं कळून सवरून नव्हे—बुद्धिपुरस्सर नव्हे—अगदीं नकळत त्याची फणा आपोआप उभारली जाते. सापाच्या मनांत त्यावेळीं पापबुद्धि असतेच असं कांहीं नाहीं—तसंच कांहींतरी झालं असावं, कदाचित् माझ्या नजरेंत त्यांना तसंच कांहीं जाणवलं असेल. पुरुष लोक म्हणत असतात, कीं अंधारांतल्या दिव्यासारखा बुरख्यांतल्या रमणीचा कटाक्ष अधिक तीव्रतेनं जाणवतो. त्यांनाही कदाचित तसंच वाटलं असेल. उगीच थोडसं हंसल्यासारखं करून त्यांनीं पुन्हां मान खालीं घातली. तें त्यांचं किंचित हंसू मीच तेवढं पाहिलं—भांड्यांतली सारी सागोती त्यांच्या पानांत ओतून मी एकदम निघून आलें.

मी थोडीशी शरमिंदी झाली होतें—थोडीशी रंजिस आलें होतें. सधवा असूनही मी जन्मविधवा होतें. लग्नाच्यावेळीं एकदांच काय ती नवऱ्याची माझी दृष्टभेट झाली होती—अर्थात् यौवनांतल्या साऱ्या प्रवृत्ती तशाच अतृप्त राहिल्या होत्या. खोल पाण्यांत दगड फेंकला तर वर तरंग येतील असं वाटून

मी बरीच ओशाळून गेलें. मनांतल्या मनांत स्त्रीजातीला मी हजार शिव्याशाप दिले—मनांतल्या मनांत मी स्वतःलाच हजार शिव्याशाप दिले—मनांतल्या मनांत मी नुसती मरून गेलें होतें.

सैंपाकघरांत परत आलें त्यावेळीं उगीचच आपलं मला वाटलं, कीं या गृहस्थांना यापूर्वी कुठं तरी पाहिलं असावं. मनांत आलेला संशय दूर करण्यासाठीं पुन्हां दाराआड उभं राहून पुन्हा एकदां त्यांना पाहून घेतलं—नीट निरखून पाहून घेतलं—पहातांच खात्री झाली—मी मनांतल्या मनांत म्हटलं, ‘ओळखलं हो ओळखलं !’

इतक्यांत रामरामबाबूंनीं पुन्हां वाढायला हांक मारली. मांसाचे वेगवेगळे प्रकार केले होते ते घेऊन गेलें. मला दिसन आलं, कीं तो कटाक्ष अजून त्यांना जाणवत होता. ते रामरामबाबूंना म्हणाले, “रामरामबाबू, आपल्या सैंपाकिणीला म्हणावं कीं सैंपाक भारी सुंदर झालाय !”

रामरामबाबूंना त्यांच्या भाषणातलें इंगित कळलं नाहीं. ते म्हणाले, “हो. ती सैंपाक करते छान.”

“तुमचं डोंबल !” मी मनांतल्या मनांत म्हटलं.

निमंत्रित बाबू म्हणाले, “यांतले कांहीं जिन्नस आमच्या गांवच्या पद्धतीनं केल्यासारखे दिसतात, त्याचंच आश्चर्य वाटलं मला.”

मी मनांतल्या मनांत म्हटलं, ‘ओळखलं !’ तसे मी ते जिन्नस आमच्या गांवच्या पद्धतीनं केले होते खरे.

रामरामबाबू म्हणाले, “असेल असेल, ती कांहीं इकडच्या प्रांतांतली नव्हे.”

आतां त्यांना धागादोरा मिळाला. एकदां माझ्या तोंडाकडे पाहून ते म्हणाले, “तूं कुठल्या गांवची ग ?”

मला पहिला प्रश्न पडला तो असा, बोलावं कीं न बोलावं ? मी ठरवलं बोलावं.

दुसरा प्रश्न—खरं बोलावं कीं खोटं बोलावं ? मी ठरवलं-खोटं बोलावं. मी असं कां ठरवलं ? स्त्रीजातीचं हृदय ज्यानं असं चातुर्यप्रिय अन् वांकड्या मार्गानं जाणारं घडवलं त्यालाच तें माहीत. मला वाटलं, तशीच जरूर पडली तर

केव्हांही मला खरंच सांगतां येईल. सध्यां कांहींतरी सांगून पहावं, असा विचार करून मी कांहींतरी उत्तर दिलं—" माझं गांव काळीदिघी. "

ते एकदम दचकले. नंतर त्यांनीं हळुच विचारलं, " कुठली काळीदिघी? डाकूंची काळीदिघी? "

मी ' हो ' म्हटलं. त्यानंतर ते कांहीं बोलले नाहींत. भांडं हातांत घेऊन मी तशीच उभी राहिलें होतें. असं उभं रहाणं अयोग्य होतं याची मला आठवण राहिली नव्हती. आतांच मी स्वतःला हजार शिव्या देऊन घेतल्या होत्या, त्याही मी विसरून गेलें. मला दिसून आलं, त्यांना जेवण नीटसं जात नव्हतं. तें पाहून रामरामबाबू म्हणाले, " उपेंद्रबाबू, थांबलांत कां? जेवा ना! " एवढंच काय तें ऐकायचं राहिलं होतं. उपेंद्रबाबू! नांव ऐकायच्या पूर्वीच मी त्यांना ओळखलं होतं—कीं हेच माझे पतिराज.

मी स्वैंपाकघरांत गेलें. हातचं भांडं फेंकून दिलं. कित्येक दिवसांनीं मला आज आनंदाचा अनुभव मिळाला होता. बाहेर रामरामदत्त म्हणाले, " काय पडलं? "

मी फेंकून दिलं होतं तें सागोतीचं भांडं.

• •

## १२

★ **या**पुढं हा माझा इतिहास लिहितांना शेंकडों वेळ मला माझ्या नवऱ्याचं नांव घ्यायची जरूर पडेल. आतां तुम्हीच पांचजणी बसून कमिटी करून ठरवा आणि मला सांगून टाका, त्यांचं नांव घेण्यासाठीं मी कोणता शब्द वापरावा? शेंपाचशें वेळ ' पतिराज पतिराज ' म्हणून कां सतावून सोडूं तुम्हाला? कीं अलिकडच्या पद्धती प्रमाणं ' उपेन्द्र ' म्हणायची सुरवात करूं? किंवा प्राणनाथ, प्राणकांत, प्राणेश्वर, प्राणपति, प्राणाधिकसारख्या शब्दांची उधळ करूं? ज्यांचं नांव घेण्यासाठीं माझा जीव आसुसलेला, क्षणाक्षणाला ज्यांचा उल्लेख करायला हवा आहे, त्यांचं नांव घ्यायचं कसं?—तो नवा शब्द या जळल्या आमच्या भाषेंतच नाहीं! घरच्या दासदासी म्हणत, म्हणून आमच्या गांवची माझी एक मैत्रिण आपल्या नवऱ्याला ' बाबू ' म्हणून हांक मारी. पण

नुसतं बाबू म्हणणं तिला गोड लागत नव्हतं—शेवटीं तिनं खूप विचार करून नवऱ्याला 'बाबूराम' म्हणून हाक मारायला सुरवात केली—तसंच कांहीं तरी करावंसं मला वाटलं.

हातचं सागोतीचं भांड फेंकून देऊन मी आपल्या मनाशीं ठरवलं, हरवलेला ठेवा मिळाला आहे, तो आतां हातसांड करायचा नाहीं. नव्या नवरीसारखं लाजत बसून स्वतःचं नुकसान करून घ्यायचं नाहीं.

विचार करून ठरवलं—अन् अशा जागीं उभी राहिलें कीं जेवणघरांतून ते बाहेर पडले कीं सरळ माझ्याकडे नजर जावी. मी आपल्याशींच म्हणत होतें,—इकडे तिकडे टेहळीत ते गेले नाहींत तर या वीस वर्षांच्या अनुभवानं मला पुरुषजातीची ओळखच पटली नाहीं असं म्हणेन.

मी अगदीं उघड उघड सांगतें—तुम्ही मला क्षमा करा—माथ्यावरचा पदर बराचसा मागं खेंचून घेऊन मी उभी राहिलें होतें. आतां हें लिहितांना शरम वाटते आहे, पण त्यावेळीं मला काय वाटत होतं याची तुम्हींच कल्पना करा.

सर्वांच्या आधीं रमणबाबू गेले. त्यांची नजर चोहोंबाजूला होती. कोण कुठं आहे याचा ते अंदाज घेत असावे. त्यानंतर रामरामबाबू गेले—त्यांनीं इकडे तिकडे मुळींच पाहिलं नाहीं. त्यानंतर माझे पतिराज गेले—त्यांचे डोळे जणूं काय चोंहीकडे टेहळणी करीत होते. मी त्यांच्या नजरेसमोर दिसलें. त्यांचे डोळे माझ्याच शोधांत होते याची मला जाणीव होती. त्यांची माझी नजरानजर होतांच—कसं सांगूं ?—सांगायला शरम वाटते—फणा उभारणं हें जसं सर्पाला स्वभावसिद्ध असतं तसंच डोळा मारणं हें आम्हा बायकांचं. हा आपला नवरा आहे म्हणून कळल्यावर डोळ्याचा बाण मारतांना थोडा अधिक विषारी कां करूं नये मी ? तो बाण मर्मीं बसून माझे 'प्राणनाथ' बाहेर गेले.

त्यानंतर मी हाराणीला शरण जायचं ठरवलं. तिला एका बाजूला बोलावून घेतांच ती हंसत हंसत आली. एकदम खो खो हंसत ती म्हणाली, "वाढायच्यावेळीं म्हाताऱ्या भटणीची कशी हबेलंडी उडाली ती पाहिली ना ?"

उत्तराची अपेक्षा न करतां ती हास्याचे फवारे उडवूं लागली.

मी म्हटलं, "तें पाहिलंय मी—पण तेवढ्यासाठीं नाहीं बोलावलं तुला.

माझ्यावर एक उपकार कर. मी जन्माची ऋणी होईन तुझी. हे पाहुणेबाबू केव्हां जाणार आहेत ती बातमी काढून मला चट्कन सांग."

हाराणीचं हंसू एकदम बंद पडलं. हंसण्याचा फवारा धुक्याच्या आगीआड नाहींसा झाला. हाराणी गंभीर होऊन म्हणाली, "छेः छेः! हें काय दिदी! असला रोग तुम्हांला आहे असं वाटलं नव्हतं मला."

मी हंसलें अन् म्हटलं, "माणसाचे सारे दिवस कांहीं सारखेच जात नाहींत. यावेळीं तुझा गुरुपदेश राहूं दे. एवढे उपकार कर. माझं एवढं काम करणार आहेस कीं नाहींस तें सांग." हाराणी म्हणाली, "कांहीं झालं तरी माझ्याकरवीं असलं काम व्हायचं नाहीं."

मी हाराणीपाशीं आलें होतें ती रिकाम्या हातानं नव्हे. पगाराच्या रुपयांतले पांच रुपये मी तिच्या हातीं दिले आणि म्हटलं, "माझी शपथ आहे तुला एवढं काम तूं करायलाच हवंस."

हाराणी ते पैसे फेंकून देत होती—पण जरा थांबली अन् तिनं ते पैसे चुलींतला विस्तव विझवण्यासाठीं जवळच माती ठेवली होती तिच्यावर ठेवून दिले. ती म्हणाली—अगदीं गंभीरपणें—आतां हंसूं मुळींच नव्हतं—ती म्हणाली, "तुमचे पैसे फेंकूनच देणार होतें, पण त्यांचा आवाज झाला असता तर तुमची बदनामी झाली असती म्हणून हळुच इथं ठेवून दिले आहेत, ते उचलून घ्या. अन् यापुढं असली भाषा माझ्यापुढं काढूं नका."

मला रडूं कोसळलं. हाराणी विश्वासू होती. इतर कुणावर विश्वास ठेवतां येत नव्हता. आतां कुणाला गाठूं? माझ्या रडण्याचं खरं कारण तिला कळण्याजोगं नव्हतं—तरीही तिला दया आली. ती म्हणाली, "रडतां कां? ते ओळखीचे आहेत का तुमच्या?"

हाराणीला सारं कांहीं सांगून टाकावं असं एकदां मनांत आलं होतं, पण कदाचित् तें तिला खरं वाटणार नाहीं आणि ती उगीच धांदल माजवील असा विचार करून मी स्वस्थ राहिलें. मनाशीं ठरवलं, कीं आतां सुभाषिणीशिवाय दुसरी गत नाहीं. तीच माझी बुद्धिदाती, तीच माझी राखणदारीण—सारं कांहीं उघड करून तिला सांगायचं अन् तिचा सल्ला घ्यायचा. मी हाराणीला म्हटलं,

" हो, ओळखीचे आहेत. तुला सारं कांहीं सांगितलं तर खरं वाटायचं नाहीं म्हणून मी उघड करून बोललें नाहीं. यांत कांहीं दोष नाहीं. "

' यांत कांहीं दोष नाहीं ' असं म्हणून गेल्यावर मी विचार केला. माझ्या दृष्टीनं दोष नाहीं खरा, पण हाराणीच्या दृष्टीनं काय? तिच्यावर उगीच शिंतोडे कां उडवावे? कुतर्क करून मनाची समजूत केली. पेंचांत असलेलं माणूस त्यांतून बाहेर पडण्यासाठीं कुतर्कांचाच अवलंब करीत असतं. मी हाराणीला पुन्हां समजावून सांगितलं, " यांत कांहीं दोष नाहीं. "

" तुम्हाला भेटायचं आहे का त्यांना? " हाराणी म्हणाली. मी ' हो ' म्हटलं. तिनं विचारलं, " केव्हां भेटायचं आहे? " मी म्हटलं, " रात्रीं–सारीं झोंपी गेल्यावर. " हाराणीनं विचारलं, " एकटंच? " मी म्हटलं, " हो, एकटंच. " तेव्हां ती म्हणाली, " हें काम माझ्याकडून व्हायचं नाहीं."

" अन् सूनबाईंनीं हुकूम केला तर? " मी म्हटलं. " तुम्हाला काय वेड लागलंय? " हाराणी म्हणाली, " गृहस्थाघरची कुलवधू ती—सतीलक्ष्मी—असल्या कामाला कशी होकार देईल ती? "

" अन् तिनं जर नकार दिला नाहीं तर जाशील? " मी म्हटलं.

" हो, जाईन. " हाराणी म्हणाली, " त्यांचा हुकूम कसा मोडीन मी? मी जाईन खरी, पण तुमचे पैसे घ्यायची नाहीं. ते तुमचे पैसे तुम्ही उचलून ठेवा. "

" ठीक आहे! " मी म्हटलं, " तशीच वेळ आली कीं पाहून घेईन. "

मी डोळे पुसले आणि सुभाषिणीकडे जायला निघालें. ती आपल्या खोलींत एकटी होती. मला पहातांच सुभाषिणीचा तो सुंदर चेहरा सकाळच्या कमळासारखा, संध्याकाळच्या निशिगंधासारखा आनंदानं उजळून उठला. ती हंसली अन् माझ्या कानाशीं तोंड देऊन म्हणाली, " कसं काय? ओळखलंस ना? "

मी आकाशांतून खालीं कोसळलें. मी म्हटलं, " म्हणजे? तुम्हाला कसं कळलं? "

सुभाषिणी तोंडभर हंसून म्हणाली, " वा ग वा, तुझा तो आकाशींचा चांद आपणच होऊन आला का तुझ्या मुठींत बसायला? आकाशांत जाळं कसं फेंकायचं तें आम्हाला चांगलं कळतं, म्हणूनच हा आकाशींचा चांद आम्हीं जाळ्यांत पकडून आणलाय तुझ्यासाठीं. "

" आम्हीं म्हणजे कुणीं ? " मी म्हटलं, " तुम्हीं अन् र-बाबू ? "
" नाहींतर दुसरं कोण ? " सुभाषिणी म्हणाली, " तूं आपल्या नवऱ्याचं अन् सासऱ्याचं नांव सांगितलं होतंस तें आठवतं ना तुला ? तें ऐकतांच र-बाबूंना ओळख पटली. तुझ्या उ-बाबूचा एक मोठा खटला त्यांच्या हातीं आहे. म्हणून त्यांनीं निमित्त काढून उ-बाबूला कलकत्त्याला बोलावून घेतलं. त्यानंतर हें निमंत्रण—"

" अन् त्यानंतर हात वर उडवून म्हातारीच्या हातचं वरणाचं भांडं पाडलं होय ? " मी म्हटलं.

" हो. तीही माझीच करामत. "

मी विचारलं, " माझी ओळख दिली आहे का त्यांना ? "

सुभाषिणी म्हणाली, " आतां काय म्हणावं तुला ? असल्या गोष्टी अशा का सांगायच्या असतात ?—डाकूंनीं तुला पकडून नेलं, त्यानंतर तूं कुठं गेलीस, काय झालं तें कुणाला माहित का आहे ? तुझी ओळख दिली तर ते एकदम घरीं घेतील का तुला ? नांवं ठेवायचे भलतींच ! र-बाबू म्हणाले, आतां तुझं तूंच काय तें पाहून घे. "

मी म्हटलं, " एकदां डोकं फोडून घेऊन पहातें. नाहींतर जीव देतें गंगेंत उडी घेऊन ! पण त्यांची माझी भेट झाली नाहीं तर काय करूं ? "

" केव्हां भेटायला हवं ? " सुभाषिणी म्हणाली, " अन् कुठं भेटणार आहेस ? "

मी म्हटलं, " माझ्यासाठीं तुम्ही एवढं केलं तसंच या बाबतींतसुद्धां मला हात द्या. त्यांच्या बिऱ्हाडीं गेलं तर भेट व्हायची नाहीं—अन् मला तिथं घेऊन जाणार कोण ? अन् भेट करवून देणार तरी कोण ? भेटायला हवं इथंच."

" केव्हां ? "

" रात्रीं. सारीं झोंपीं गेल्यावर ! "

" अभिसारिकेसारखं होय ? "

" त्याखेरीज दुसरा काय उपाय आहे ? " मी म्हटलं, " अन् त्यांत दोष तरी कसला ? तो नवराच ना माझा ? "

" नाहीं, दोष नाहीं. " सुभाषिणी म्हणाली, " पण त्यासाठीं त्यांना रात्रीं इथं अडकवून ठेवलं पाहिजे. त्यांचं बिऱ्हाड आहे इथून जवळच, तेव्हां तें कसं जमणार ? थांब, र-बाबूंना एकदां विचारून पहातें. "

सुभाषिणीनं रमणबाबूंना भेटून कांहींतरी खलबत केलं आणि परत येऊन ती मला म्हणाली, " र-बाबूंना एवढंच करतां येईल—दाव्याचे कागदपत्र एव्हांच दाखवायचे नाहींत—जरा अडवून धरायचं—कागदपत्र दाखवायची वेळ संध्याकाळनंतरची ठरवायची. संध्याकाळीं तुझा नवरा आल्यावर त्याला कागदपत्र दाखवायचे, चर्चा करायला शक्य तेवढा वेळ लावायचा, रात्र झाली म्हणून मग त्यांना जेवायला राहून घ्यायचं, त्यानंतर तुझी काय अक्कलहुषारी असेल ती लढव. रात्रीं इथंच राहा असं आम्ही कसं सांगायचं त्यांना ? "

मी म्हटलं, " तें तुम्ही सांगायला नको आहे. तें काय तें मी पाहून घेईन. त्यांना मी रहा म्हटलं कीं ते रहातील अशी माझी खात्री आहे. मी एकदोन वेळ त्यांना डोळा घातला होता. त्यांनींही मला डोळा घातला होता—एकंदरींत माणूस बरा नाहीं दिसत, पण माझं सांगणं त्यांना कळवायचं कसं ? मी दोन ओळी चिठ्ठी लिहीन, ती त्यांच्या हातीं पोंचती झाली म्हणजे झालं. "

" कुणातरी नोकराच्या हातीं चिठ्ठी दे पाठवून. "

" जन्मजन्मांतरीं नवरा भेटला नाहीं तरी चालेल, पण कुठल्याही पुरूष माणसाला हें काम सांगायचा धीर व्हायचा नाहीं मला. "

" तें खरं आहे. " सुभाषिणी म्हणाली, " मग कुणीतरी बाई पहा. "

" अशी विश्वासू बाई आहे कोण ? " मी म्हटलं, " तिनं कुठंतरी बोलून टाकलं तर सारंच मुसळ केरांत जाईल. "

" हाराणी तर विश्वासू आहे ? "

" हाराणीला मी सांगितलं होतं, " मी म्हटलं, " ती विश्वासू आहे म्हणूनच ती ऐकेना, पण तुम्ही समज दिली तर ती जाईल. पण तुम्हीं तरी तिला कसं सांगायचं ? मरायचं तर मी एकटीच मरेन !—" मेल्या डोळ्यांत पाणी आलं कसं तें !

" काय म्हणाली हाराणी ?" तिनं विचारलं.

" तुम्हीं जर नको म्हटलं नाहीं तर ती जाईल."

सुभाषिणीनं थोडावेळ विचार केला. ती म्हणाली, " संध्याकाळीं तिला याच कामासाठीं मला भेटायला सांग."

• •

## १३

★ संध्याकाळीं माझे पतिराज कागदपत्र घेऊन रमणबाबूंना भेटायला आले. ते आल्याचं कळतांच मी पुन्हा एकदां हाराणीचे हातपाय धरले. हाराणीचं गाणं सुरू होतं, " त्यांनीं जर नको म्हटलं नाहीं तर जाईन. मग माझी खात्री पटेल, कीं यांत कांहीं दोष नाहीं."

मी म्हटलं, " काय वाटेल तें कर. माझा प्राण कंठाशीं आलाय."

एवढं इंगित कळतांच हाराणी हंसत हंसत तडक सुभाषिणीपाशीं गेली. मी तिची वाट पहात राहिलें होतें. हंसण्याचे फवारे उधळीत, फुरफुरणारे केंस मागें सारीत, ती धापा टाकीत धांवत आली. त्यावेळीं मी तिला विचारलं, "काय ग, एवढं हंसायला काय झालं ?"

" कां हो तुम्ही मला असल्या जागीं पाठवलं ?" हाराणी म्हणाली, " जीव जायची वेळ आली होती."

" कां ग ?"

हाराणी म्हणाली, "त्यांच्या खोलींत केरसुणी नसते. जरूर पडेल तेव्हां आम्ही केरसुणी घेऊन जाऊन खोली झाडून येतों. आज पाहिलं तों त्यांच्या हातापाशींच कुणीतरी केरसुणी ठेवली होती. मी गेलें अन् ' जाऊं का ?' म्हणून विचारलं तेव्हां हातीं केरसुणी घेऊन त्यांनीं मला मारायला सुरवात केली. पळायची संवय होती म्हणून बचावलें. नाहींतर प्राण गमावून बसलें असतें. तरीपण चार फटके बसलेच आहेत पाठीवर—पहा बघूं, पाठीवर वण पडलेयत कीं काय तें ?"

हाराणीनं हंसत हंसत आपली पाठ उघडून दाखवली. खोटी मेली ! तिथं वण नव्हते माराचे. मग ती म्हणाली, " आतां काय करायला हवं आहे तें सांगा."

" झाडू खाल्याशिवाय जायचं नव्हतं वाटतं ? " मी म्हटलं.

" झाडू खाल्ली खरी, पण नको जाऊं असं कांहीं त्यांनीं म्हटलं नाहीं. त्यांनीं जाऊं नको म्हटलं नाहीं तर मी जाईन असंच सांगितलं होतं ना मी ? "

" झाडू मारणं म्हणजे नको म्हणणं नव्हे वाटतं ? "

" असं पहा माझे सोनुले, " हाराणी म्हणाली, " त्यांनीं झाडू उगारली तेव्हां त्या गालांतल्या गालांत हंसत होत्या.—जाऊंदे तें. आतां काय करायला हवं तेवढं सांग ? "

मी एक कागद घेऊन त्याच्यावर लिहिलं :—

" मी आपल्याला मन आणि प्राण अर्पण केले आहेत. त्याचा स्वीकार करणार ना ? तर मग आज रात्रीं याच घरीं झोंपायला रहा. खोलीचं दार उघडं ठेवा.

— तीच सैंपाकीण "

पत्र लिहिलं खरं पण शरमेनं विहिरींत जीव द्यावासं वाटलं. कुठल्या काळोखांत लपून बसूं ? विधात्यानं नशिबीं लिहिलं होतं खरं ! कुठल्याही कुलीन कन्येच्या कपाळीं हें दुर्भाग्य लिहिलं नसेल.

कागदाची नीट घडीवर घडी करून हाराणीच्या हातीं दिली. मी तिला म्हटलं, " जरा थांब. "

सुभाषिणीकडे गेलें अन् तिला सांगितलं, " जरा दादाबाबूंना बोलावून घ्या. उगीच कांहींतरी बोलून थोडा वेळ काढा अन् मग त्यांना जाऊं द्या. सुभाषिणीनं तसंच केलं. रमणबाबू तिथं येतांच मी हाराणीला जाऊन सांगितलं, " आतां जा. "

हाराणी तो कागद घेऊन परत आली. त्याच्या एका कोपऱ्यांत लिहिलं होतं, " ठीक आहे. "

मी हाराणीला म्हटलं, " माझ्यासाठीं एवढं केलंस तसंच आणखी एक काम कर. रात्रीं सारीं झोंपी गेल्यावर त्यांच्या झोंपायच्या खोलीपर्यंत मला पोंचवून ये. "

हाराणी म्हणाली, " हो !—त्यांत कांहीं दोष नाहीं ना ? "

" मुळींच नाहीं. " मी म्हटलं, " पूर्वजन्मीं तो माझा नवरा होता. "

" पूर्वजन्मीं कीं याच जन्मीं तेंच नीटसं कळत नाहीं मला. " हाराणी म्हणाली.

मी हंसून म्हटलं " चूप ! "

हाराणी हंसत हंसत म्हणाली, " अन् जर याच जन्मींचा असेल तर मी पांचशें रुपये बक्षीस घेईन, नाहींतर झाडू खाल्ल्याचं श्रेय नाहीं मिळायचं मला."

मी जाऊन सुभाषिणीला ही सारी हकीकत सांगितली. सुभाषिणी आपल्या सासूबाईंना म्हणाली, " आज कुमुदिनीची प्रकृती बरी नाहीं. तिला आज सैंपाक झेंपायचा नाहीं. सोनूच्या आईलाच सैंपाक करायला सांगा. "

सोनूची आई सैंपाकाला लागली. सुभाषिणी मला घेऊन आपल्या खोलींत गेली अन् तिनं दाराला कडी लावली. मी विचारलं, " हें काय ? ही कैद कशाला ? "

सुभाषिणी म्हणाली, " तुला सजवणार आहें. "

तिनं माझा चेहरा चांगला नीटनेटका पुसून घेतला. केसांना सुगंधी तेल लावून तिनंच केंस विंचरून खोपा बांधला. ती म्हणाली, " या कामाची मजुरी हजार रुपये. सारं कांहीं ठीकठाक झालं कीं हे माझे हजार रुपये पाठवून दे. " त्यानंतर तिनं आपलं एक झगझगितसं लुगडं बाहेर काढलं अन् ती मला नेसवूं लागली. मी नको म्हणत होतें, पण ती ऐकेना. ओढाताणींत भलताच प्रसंग ओढवेल या भीतीनं मी तें लुगडं नेसलें. त्यानंतर तिनं आपले दागिने बाहेर काढले आणि ती ते माझ्या अंगावर चढवूं लागली. मी म्हटलं, " एवढं मात्र माझ्याकरवीं व्हायचं नाहीं. "

आम्ही दोघंही खूप भांडलों. मी कांहीं केल्या ऐकत नाहीं असं पाहून ती म्हणाली, " तर मग आतां हें दुसरं पहा—" असं म्हणून तिनं शेजारच्या फुलांच्या परडींतून मल्लिकेच्या कळ्यांच्या वेगवेगळ्या माळा काढल्या आणि त्या माझ्या गळ्यांत हातांत बांधल्या. नंतर तिनं सोन्याच्या इअरींग बाहेर काढल्या आणि म्हटलं, " माझ्या स्वतःच्या पैशानं मी ह्या र-बाबूंना सांगून विकत आणल्या आहेत—तुला देण्यासाठीं. यापुढं कुठंही असलीस तरी

एवढी ही माझी आठवण तुझ्यापाशीं राहील. कुणी सांगावं, यापुढं कदाचित तुझी माझी भेटसुद्धां व्हायची नाहीं—देव करो आणि तसंच होवो—एवढ्या ह्या इअरींग तुझ्या कानांत घालतें. आतां मात्र नाहीं म्हणू नको."

बोलतां बोलतां सुभाषिणीच्या डोळ्यांना पाणी आलं. यापुढं नाहीं म्हणणं मला अशक्य झालं. सुभाषिणीनं ते दागिने माझ्या कानांत घातले.

ही सारी साजसज्जा पुरी झाली त्यावेळीं दाई मुलाला घेऊन आली. त्याला कवटाळून घेऊन घटकाभर मी त्याच्याशीं खेळलें. गोष्टी ऐकतां ऐकतां तो झोंपी गेला. त्याचवेळीं मनांत एक सुखाची कल्पना आली. या सुखाच्या काळांत सुभाषिणीला ती सांगितल्यावांचून मला राहवेना. मी म्हटलं, "मला आनंद झालाय खरा, पण मनांतल्या मनांत त्यांच्याबद्दल वाईट वाटतंय मला. ते माझे पती आहेत हें मी ओळखलंय, तेव्हां मी जें कांहीं करतें आहें त्यांत दोष नाहीं. त्यांनीं मला ओळखल्याचं कांहींच लक्षण दिसत नाहीं. मी त्यांना पाहिलं होतं ते चांगले प्रौढ असतांना, तरीसुद्धां मला संशय वाटत होता, पण मला त्यांनीं पाहिलं तेव्हां मी मुलगी होतें अकरा वर्षांची—अर्थात् त्यांनी मला ओळखल्याचं लक्षण दिसून आलं नाहीं. असं असूनही, मी परस्त्री आहें हें माहीत असूनही ते माझ्या प्रेमांत सांपडले आहेत हें पाहून मला वाईट वाटतंय. ते माझे पती, मी त्यांची पत्नी, त्यांना नांव ठेवणं माझ्या लेखीं अयोग्य."

माझं व्याख्यान ऐकून सुभाषिणी म्हणाली, "तुझ्यासारखी गाढवी कुणी नाहीं! त्यांना बायको नाहीं ना?"

"अन् मला नवरा आहे वाटतं?" मी म्हटलं.

"आतां काय म्हणावं तुला?" सुभाषिणी म्हणाली, "पुरुष आणि बायका यांची गोष्ट सारखीच असते का? तूं कमिसरिएटची नोकरी करून पैसे मिळवून दाखव पाहूं."

मी म्हटलं, "त्यानीं बाळंत होऊन मुलं आणून दाखवावीं म्हणजे मी कमिसरिएटची नोकरी करतें. जें ज्याला साधतं तें त्यानं करावं. माझं म्हणणं एवढंच, कीं इंद्रियदमन करणं पुरुषांना इतकं का कठीण जातं?"

"बरं बरं!" सुभाषिणी म्हणाली, "आधीं तुझं घर उभं राहूं दे की

मग घाल त्या घराला आग. सध्यां या गोष्टी राहूं दे. नवऱ्याचं मन कसं झुलवणार आहेस त्याची आधीं परीक्षा दे पाहूं."

मी थोडीशी विचारांत पडलें आणि म्हटलं, " ही विद्या कांहीं मी शिकलें नाहीं."

" तर मग माझ्यापाशीं शीक. या शास्त्रांत मी पंडिता आहें हें माहित आहे ना तुला ?"

" तें मी पहातेंच आहें रोज." मी म्हटलं.

" तर मग आतां हा धडा घे." ती म्हणाली, " समज, तूं आहेस एक पुरुष माणूस—आतां मी तुला कशी भुलवतें बघ !" असं म्हणून ती सटवी माथ्यावरचा पदर ओढून लाजत मुरकत विडा हातीं घेऊन माझ्यासमोर येऊन उभी राहिली. तो विडा तिनं माझ्या हातीं दिला. तो विडा रमणबाबूसाठीं असे. ती स्वतःसुद्धां कधीं तो खात नसे. रमणबाबूंची गुडगुडी तिथंच होती, तिच्यावर तिनं चिलीम ठेवली आणि नळी लावली. चिलमींत नुसती राखच होती. ती गुडगुडी माझ्यासमोर धरून तिनं फुंकर घालायला सुरवात केली. त्यानंतर फुलानं मढवलेला ताडाचा पंखा घेऊन मला जेव्हां ती वारा घालूं लागली तेव्हां तिच्या हातांतील बांगड्यांचा आवाज मला मोठा मिष्ट वाटूं लागला.

मी म्हटलं, " हें तर दासीचं काम. दासीचं काम करण्यांत मी किती निष्णात आहें एवढंच दाखवण्यासाठीं का आज मी त्यांना धरून ठेवलंय ?"

" आम्हीं दासी नव्हे तर कोण ?"

मी म्हटलं, " ज्यावेळीं प्रेमाचा उगम होईल त्यावेळीं दासीपणाची भावना आपोआप नाहींशी होईल. त्यावेळीं वारा घालीन, पाय चेपीन, विडा करून देईन, गुडगुडी भरून देईन, पण यावेळीं मात्र तसलं कांहीं बोलूं नकोस."

तेव्हां सुभाषिणी हंसत माझ्यापाशीं येऊन बसली. माझा हात आपल्या हातीं घेऊन गोडगोड गोष्टी बोलूं लागली. पहिल्या पहिल्यानं ती हंसत हंसत, पान चावीत चावीत, कानांतले डूल हालवीत हालवीत तिनं जें सोंग आणलं होतं त्याच धोरणानं ती बोलत होती. बोलतां बोलतां तें उसनं सोंग ती विसरली अन् जिवाभावाच्या मैत्रिणीसारखी बोलूं लागली. मी आतां तिला सोडून जाईन असं तिला वाटूं लागलं होतं. तो उल्लेख करतांना तिच्या डोळ्यांतून एक

आसवाचा थेंब टचकन् खालीं पडला. तेव्हां तिला रंगांत आणायच्या उद्देशानं मी म्हटलं, " आतां जें मला शिकवलंस तें बायकांच्या हातचं अस्त्र आहे खरं, पण तें उ-बाबूंवर चालेल का ? "

तें ऐकून सुभाषिणी तोंडभर हंसली आणि म्हणाली, " तर मग तुला आमचं ब्रह्मास्त्र आतां शिकवतें ! " असं म्हणून मेलीनं दोन्ही हात माझ्या गळ्या-भोंवतीं टाकले अन् लगेच एका हातानं माझी हनुवटी वर उचलून माझं चुम्बन घेतलं. तिच्या डोळ्यांतल्या आसवांचा एक थेंब माझ्या गालावर पडला.

मी आंवढा गिळून डोळ्यांतलीं आसवं आवरून धरलीं. मी म्हटलं, " हें झालं संकल्प केल्याशिवाय दक्षणा द्यायला शिकवणं. "

सुभाषिणी म्हणाली, " एकूण काय ? तुला ही विद्या यायची नाहीं ! तुला काय माहित आहे त्याची परीक्षा दे पाहूं माझ्यासमोर ! आतां हें पहा—समज —मी उ-बाबू—" असं म्हणून ती पुरुषी थाटांत कोचावर बसली—हसूं आवरत नव्हतं म्हणून ती पदराचा बोळा तोंडांत धरीत होती. हसूं थांबलं तेव्हां तिनं एकदां माझ्याकडे टकमक पाहिलं—पुन्हां तिला हसूं कोसळलं. पुन्हा हसूं थांबल्यावर ती म्हणाली, " आधीं परीक्षा दे. "

मी त्यावेळीं कशी परीक्षा दिली तें आतांच सांगत नाहीं. सुभाषिणीला माझ्या कसबाची थोडी चुणुक दाखवली.

सुभाषिणीनं मला कोचावरून लोटून दिलं आणि म्हटलं, " दूर हो सटवे ! अस्सल नागीण आहेस तूं. "

" असं कां म्हणतेस ? " मी विचारलं.

सुभाषिणी म्हणाली, " असल्या हंसत्या नजरफेंकीसमोर टिकेल का कुणी पुरुष ? मरून भूत होईल बेटा ! "

" तर मग परीक्षा पास ? " मी विचारलं.

" एकदम पास !" ती म्हणाली, " कमिसरिएटच्या एकशेंएकूणसत्तर पूर्वजांनीं असली चमक कधीं पाहिली नसेल ! बेट्याचं डोकं जर फिरूं लागलं तर बदामाचं तेल चोळ त्याच्या डोक्याला."

मी म्हटलं, " ठीक आहे. मला वाटतं बाबूलोकांचीं जेवणीं झालीं असावीं.

रमणबाबू आतां इकडे येतील. मी आतां जातें. तूं शिकवलंस त्यांतलं एकच मला मोठं गोड लागलं—तें चुंबन ! पुन्हा एकदां शिकव पाहूं. ”

सुभाषिणीनं दोन्ही हात माझ्या गळ्याभोंवती टाकले. मीही माझ्या हातांनीं तिला विळखा घातला. गाढ आलिंगन देऊन आम्ही पुन्हा ते धडे एकमेकांना शिकवले. तशाच गळ्यावर गळा टाकून आम्ही थोडावेळ रडलों. कुणी कधीं अनुभवला असेल का असला प्रसंग ? तें प्रेम—सुभाषिणीसारखं प्रेम करायला येत असेल का कुणाला ?

मेलें तरी मी सुभाषिणीला विसरणार नाहीं.

• •

## १४

★ हाराणीला सूचना देऊन मी माझ्या खोलींत गेलें. बाबूंचीं जेवणीं झालीं होतीं, इतक्यांत एकदम कांहींतरी गडबड झाली. कुणी पंखा मागत होता, कुणी पाणी मागत होता, कुणी औषध आणा म्हणे, तर कुणी डॉक्टरला बोलवा म्हणत होते. सर्वांची मारे धमाल उडाली होती. हाराणी हंसत हंसत आली. मी तिला विचारलं, “ ही कसली ग गडबड ? ”

“ त्या पाहुणेबाबूंना चक्कर आली—मूर्च्छित पडले. ”

“ मग काय झालं ? ” मी विचारलं.

“ आतां सावध झाले आहेत. ”

“ मग काय झालं ? ”

“ अगदीं थकून गेले आहेत. घरीं जायची ताकद नाहीं. इथंच बड्या बैठकखान्याच्या शेजारच्या खोलींत झोंपले आहेत. ”

मला माहित होतं, कीं हें सारं त्यांचं ढोंग होतं. मी म्हटलं, “ सारे दिवे मालवले, सारीं झोंपी गेलीं, कीं मला सांग. ”

“ आजारी आहेत ना ते ? ” हाराणी म्हणाली.

“ आजारी आहे तुझं डोंबल ! ” असं मी म्हटलं तेव्हां हाराणी हंसत हंसत निघून गेली.

सारे दिवे मालवल्यावर अन् सारे झोंपी गेल्यावर हाराणी आली आणि तिनं मला बरोबर नेऊन त्यांची खोली दाखवली. ती निघून गेल्यावर मी खोलींत प्रवेश केला. ते बिछान्यावर एकटेच पडले होते. आजारीपणाचं लक्षण दिसत नव्हतं. खोलींत भलेमोठे दोन दिवे तेवत होते, त्यांचा प्रकाश त्यांनीं आपल्या अंगावर घेतला होता. मी शरविद्ध झालें होतें. माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले होते.

वयांत आल्यावर नवऱ्याची अन् माझी पहिली भेट. कोणत्या शब्दांनीं त्या आनंदाचं वर्णन करूं ? मी मुळची मोठी बोलकी—पण त्यांच्याशीं बोलायला गेलें तेव्हां माझ्या तोंडांतून एक शब्दही बाहेर फुटेना. गळा दाटून आला. सर्वांगाला थरकांप सुटला. हृदयांत नगारा वाजूं लागला. जीभ कोरडी पडली. तोंडावाटे शब्द बाहेर फुटेना म्हणून मी रडूं लागलें.

त्या रडण्याचा उद्देश त्यांना कळला नाहीं. ते म्हणाले, “ रडतेस कां ? मी कांहीं तुला बोलावलं नव्हतं !—तूंच होऊन आलीस, मग आतां रडतेस कां ?”

तें कठोर वाक्य माझ्या हृदयाला लागलें. मी कुलटा आहें अशी का कल्पना केली त्यांनीं ? मला अधिकच रडूं कोसळलं. एकदां वाटलं, ही यातना सोशीत बसण्यापेक्षां एकदां आपली ओळख देऊन टाकावी. पुन्हा वाटलं, माझ्या बोलण्यावर त्यांचा विश्वास बसला नाहीं तर ? अर्थात मी ओळख दिली नाहीं. एक मोठा सुस्कारा सोडून डोळे पुसून मी त्यांच्या-बरोबर बोलत बसलें. इकडल्या तिकडल्या गोष्टी झाल्यावर ते म्हणाले, “ तुझं घर काळीदिघीला आहे हें ऐकून मला आश्चर्य वाटलं. काळीदिघीच्या ओसाड भूमींत अशी सुंदरी जन्माला येईल असं मला स्वप्नांत देखील वाटलं नसतं. ”

“ मी सुंदरी कीं वांदरी ? ” मी म्हटलं, “ आमच्या या प्रांतांत लोक आपली बायकोच काय ती सुंदर असं म्हणत असतात—” असं कांहींतरी ढोंग करून मी त्यांच्या बायकोची गोष्ट काढून विचारलं, “ तिचा पत्ता लागला का ? ”

“ नाहीं, ” ते म्हणाले, “ तूं केव्हां आलीस आपल्या गांवांतून ? ”

“ ती सगळी भानगड झाल्यानंतरच मी इकडे आलें. “ मी म्हटलं, “ तर मग आतां तुम्ही पुन्हा लग्न केलं असेल ? ”

ते म्हणाले, “ नाहीं. ”

ते एकाच शब्दांत बोलत होते. नुसतं ‘ हो ’ ‘ ना ’ म्हणत होते. मी याचक म्हणून आलें होतें—अभिसारिका म्हणून आलें होतें—पण माझं कौतुक करायचंही त्यांना सुचत नव्हतं. अचंबित मुद्रेनं ते माझ्याकडे नुसते टकमक पहात राहिले होते. एकदां मात्र ते म्हणाले, “ माणसाच्या जातींत मी एवढं सौंदर्य कधीं पाहिलं नव्हतं.”

सवत आली नाहीं हें ऐकून मला आनंद झाला. मी म्हटलं, “ आपल्या-सारखी मोठीं माणसं म्हणूनच विचारावं लागतं—नाहींतर यापुढं कधीं जर आपली बायको सांपडली तर दोघां सवतींची झोंबाझोंबी सुरू व्हायची.”

ते उगीच थोडेसे हंसले आणि म्हणाले, “ त्याची काळजी नको. ती सांप-डली तरीसुद्धां तिला मी घरीं घेईन असं समजूं नकोस. ती आतां जातिभ्रष्ट झाली आहे—गेली आहे आमच्यांतून. ”

माझ्या मस्तकावर वज्राघात झाला. सारी आशा, सारा भरंवसा कुठल्याकुठं उडून गेला. यापुढं माझी ओळख पटली तरीसुद्धां पत्नी म्हणून हे माझा स्वीकार करणार नाहींत. माझा स्त्री-जन्म फुकट गेला.

मनाचा हिय्या करून मी विचारलं, “ आतां जर ती तुम्हाला भेटली तर तुम्ही काय कराल ? ”

ते गंभीरपणें म्हणाले, “ तिचा त्याग करीन ! ”

किती निर्दय ! मी स्तंभित झालें. सारी पृथ्वी माझ्या डोळ्यांसमोर गरगर फिरूं लागली.

त्या रात्रीं पतीच्या शेजारीं असल्यावेळीं मी प्रतिज्ञा केली, “ हे एक मला पत्नी म्हणून ग्रहण तरी करतील, नाहींतर मी जीव तरी देईन.”

• •

## १५

★ **आतां** माझ्या मनांतली सारी काळजी दूर झाली होती. ते आतां माझ्या मुठींत येऊन चुकले आहेत हें यापूर्वीच मला कळून चुकलं होतं. मी आपल्याशींच म्हटलं, “ गेंड्यानं शिंग मारण्यांत जर पाप

नसेल, हत्तीच्या दांत खुपसण्यांत जर पाप नसेल, वाघाच्या पंजे मारण्यांत जर पाप नसेल, रेड्यानं शिंग मारण्यांत जर पाप नसेल, तर मग मला तरी पाप कसलं ? जगदीश्वरानं जें हत्यार आम्हांला दिलं आहे, त्याचा उभयतांच्या कल्याणासाठीं मी उपयोग करीन. पैंजण बांधून पाय झाडायची जर कोणती वेळ असेल तर ती आतांच. ''

मी एकदम त्यांच्यापासून दूर होऊन पलिकडे जाऊन बसलें. अगदीं हंसतमुखानं बोलत बसलें. तें उठून माझ्याजवळ आले तेव्हां मी त्यांना म्हटलं, '' माझ्या जवळ येऊं नका. तुम्हाला भ्रम झाला आहेसं वाटतं—'' ( हंसत हंसत मी असं बोललें आणि बोलत बोलत मी माझ्या केंसाचा बुचडा सोडून टाकला—खरं सांगितल्याशिवाय कसं कळेल कुणाला ?—अन् पुन्हा बुचडा बांधूं लागलें )—'' तुम्हाला भ्रम झालासं वाटतं ? मी कुलटा नाहीं. गांवची खबर तुमच्याकडून कळेल म्हणून मी आलें होतें. माझ्या मनांत कसलंच पाप नव्हतं. '' माझं हें बोलणं त्यांना खरं वाटलं नसावं. ते पुढं सरकले. मी हंसत हंसत म्हटलं, '' ऐकूं आलं नाहीं का मी काय म्हटलं तें ?—तर मग मी चाललें ! तुमची आमची हीच भेट. '' असं म्हणून जसं त्यांच्याकडे पाहिलं पाहिजे होतं तसंच पहात पहात माझे भुरभुरे कुरळे सुगंधी तेलानं माखलेले सुटलेले केंस अगदीं बेसावधपणें त्यांच्या गालाला चाटून जातील अशा रीतीनें, संध्याकाळच्या वसंतऋतूंतल्या वाऱ्यांत आंदुळणाऱ्या लतेसारखी, गिरकी घेऊन मी उभी राहिलें.

खरोखरच मी उठून उभी राहिलें असें पाहून ते खिन्न झाले. त्यांनी येऊन माझा हात धरला. माझ्या मनगटांतल्या मल्लिकेच्या कळ्यांच्या कंकणांवर त्यांचा हात पडला. हात धरतांक्षणींत ते दचकले. माझ्या हाताकडेसच पहात राहिले. मी म्हटलं, '' पाहातां आहां काय ? ''

ते म्हणाले, '' हें काय फूल ? कसलीं हीं फूलं ? फुलांपेक्षां माणूसच असतं सुंदर. मल्लिकेच्या फुलापेक्षां माणूस सुन्दर असतं हें मला आज पहिल्यानं कळलं. '' मी रागारागानं हात ओढून घेतला—तरीपण हंसलेंच.—मी म्हटलं, '' सभ्य माणूस दिसत नाहीं तुम्ही. मला हात लावूं नका. मला अशीतशीच कुणी समजूं नका. '' असं म्हणून मी चटकन् दारापाशीं गेलें. माझ्या पतिराजांनीं—

अजूनसुद्धां आठवण झाली कीं वाईट वाटतं —हात जोडून मला हांक मारली, " एवढं माझ ऐक—जाऊं नकोस. तुला पाहून मी पागल झालोंय. असलं सौंदर्य मी कधीं पाहिलं नव्हतं—अन् मला वाटतं यापुढं दिसणारही नाहीं मला ! —"

मी मागं फिरलें पण बसलें नाहीं. मी म्हटलं, " कोण कस्पट मी ! तुमच्यासारखं हातीं आलेलं रत्न टाकून जातें आहें, यावरून तुम्ही माझ्या दुःखाची कल्पना करा. पण काय करूं ? माझा एकच ठेवा म्हणजे धर्म. एक दिवसाच्या सुखासाठीं मी कां माझा धर्म बुडवूं ? विचार न करतां—मागंपुढं न पहातां मी आपल्यापाशीं आलें, असंच अविचारानं मी आपल्याला पत्र लिहिलं, पण अजून मी एकदम अधःपाताच्या दरडींत कोसळलें नाहीं. अजूनही माझी वाट मोकळी आहे. याच वेळीं मला ही जाणीव झाली हें माझं भाग्य ! मी चाललें."

ते म्हणाले, " तुझा धर्म तुझ्यापाशीं–पण तूं अशी कांहीं जादू टाकली आहेस माझ्यावर, कीं आतां मला धर्म आणि अधर्म हे दोन्ही सारखेच झाले आहेत. मी शपथेवर सांगतों तुला, कीं तूं जन्मभर माझी हृदयेश्वरी होऊन रहा. एवढीसुद्धां शंका बाळगूं नकोस."

मी हंसलें आणि म्हणालें, " पुरुषाच्या शपथेवर माझा विश्वास नाहीं. एका क्षणाच्या भेटींत का एवढ्या थरावर गोष्टी येतात ? " असं म्हणून मी पुन्हा निघालें–पुन्हां दारापर्यंत आलें. तेव्हां अनावर होऊन त्यांनीं दोन्ही हातांनीं माझे पाय धरून माझा रस्ता आडवला. ते म्हणाले, " असं हें सौंदर्य कधींच पाहिलं नव्हतं मी !" काळीज फुटून त्यांनीं एक सुस्कारा सोडला. त्यांची ती दशा पाहून मला फार दुःख झालं. मी म्हटलं, "तर मग चला तुमच्या बिऱ्हाडीं–इथंच राहिलें तर कदाचित् तुम्ही मला टाकून जाल." त्यांनीं लगेच कबुली दिली. त्यांच्या बिऱ्हाडाची जागा तिथून फारशी दूर नव्हती. त्यांची गाडी हजर होती अन् दरवानही झोंपी गेले होते. मुकाट्यानं दार उघडून जाऊन आम्ही गाडींत बसलों आणि त्यांच्या मुक्कामी पोंचलों.

तें घर दोन मजली होतं. आंत गेल्याबरोबर मी एका खोलींत आधींच शिरलें आणि दार बंद करून घेतलें. ते बाहेरच राहिले. बाहेरून ते काकुळतीला येऊन बोलत होते. मी आंतून हंसत हंसत म्हटलं, " आतां मी

तुमची दासी झालें—पण तुमच्या प्रेमाचा वेग सकाळपर्यंत टिकतो कीं नाहीं तें पहायचंय मला. उद्यां त्याचा प्रत्यय आला तरच पुन्हा तुमच्याशीं बोलेन. आज हें एवढंच ! ”

मी दार उघडलं नाहीं. अर्थात ते दुसरीकडे जाऊन राहिले असावे. जेष्ठ महिन्याच्या उन्हाळ्याच्या कडाक्यांत तहानेनं व्याकूळ झालेल्या रोग्याला तळ्याच्या कांठीं बसवून तोंड घट्ट बांधून ठेवलं, तर पाणी पिणं त्याला अशक्य होतं आणि मग त्याचं पाण्यावरचं प्रेम वाढतंच कीं नाहीं ?

बऱ्याच वेळानं मी दार उघडलं. पहातें तों माझे पतिराज दारांतच उभे होते. मी बाहेर येऊन त्यांचा हात धरला आणि म्हटलं, “ तुम्ही माझे प्राणनाथ—एकदम रामरामदत्तांच्या घरीं तरी पाठवून द्या, नाहींतर एक आठवडाभर माझ्याशीं बोलूं तरी नका. हा आठवडाभर तुमच्या परिक्षेची मुदत. ”

त्यानीं आठवड्याची मुदत कबूल केली.



## १६

★ पुरुषाला पोळून काढण्यासाठीं विधात्यानें जीं जीं साधनं बायकांच्या जातीला पुरवलीं आहेत, त्या साऱ्या साधनांचा उपयोग करून एक आठवडाभर मी माझ्या नवऱ्याला सतावून सोडलं. किती झालं तरी मी स्त्री—ती सारी हकीकत मी कशी सांगूं तुम्हाला ? आग पेटवायचं मला जमलं नसतं तर गेल्या रात्रीं मी ती इतकी शिलगावली नसती. पण ती आग मी कशी शिलगावली, तिला कशी फुंकर घातली, माझ्या नवऱ्याचं हृदय मी कसं भाजून काढलं, तें सांगायला मला शरम वाटते. याच प्रसंगांतून जी कुणी गेली असेल तिलाच माझ्या या कवटाळाची कल्पना येईल-किंवा ज्या असल्या स्त्रीच्या तावडींत कुणी सांपडला असेल, त्यालाच तेवढं तें कळेल. स्त्रीजात म्हणजे या जगांतला मोठाच कांटा असं म्हणतात. आमच्या या जातीच्यापायीं जगांत जेवढं अनिष्ट घडून आलंय तेवढं कांहीं पुरुषांना घडवतां आलं नसेल. ही असली जीवघेणी विद्या साऱ्याच बायकांना अवगत नसते म्हणून बरं, नाहीं तर इतक्या दिवसांत पृथ्वी निर्मनुष्य झाली असती.

ह्या आठवडाभर मी सारखी त्यांच्या सहवासांत रहात होतें. गोड गोड बोलत होतें. एक क्षणभर सुद्धां नीरस भाषण करीत नव्हतें. हंसणं, पहाणं, देहाची हालचाल करणं हें नखरेल नटव्या स्त्रियांचं अस्त्र असतं. पहिल्या दिवशीं मी जरा आदरानंच बोलत होतें. दुसऱ्या दिवशीं थोडं अनुरागाचं लक्षण दाखवलं, तिसऱ्या दिवशीं घरकामाचा सारा भार मी आपल्या हातीं घेतला; त्यांचं जेवण-खाण ठाकठीक ठेवायचं, स्नानाची नीटनेटकी व्यवस्था करायची, काळजी-पूर्वक त्यांचा बिछाना घालायचा—ज्या योगानं सर्वप्रकारें त्यांना आराम वाटेल त्या साऱ्या गोष्टी करायची मी सुरवात केली.

मी स्वतः सैंपाक करीत होतें, स्वतः वाढीत होतें, अगदीं बारीकसारीक गोष्टींकडे स्वतः लक्ष देत होतें. जरा कुठं त्यांची प्रकृति कमजास्त दिसली तर रात्रभर जागून सेवा करीत होतें.

मी हात जोडून सांगतें, हें सारं माझं ढोंग होतं असं मात्र कुणी समजूं नये. केवळ भरणपोषणाच्या लोभानं किंवा नवऱ्याच्या धनानं धनेश्वरी व्हावं या लालचीनं कांहीं मी हें सारं करीत नव्हतें. नवरा पुन्हा मिळावा म्हणून खोटं प्रेम दाखवणं मला शक्यच नव्हतं—इन्द्राची इंद्राणी व्हावं या लोभानं सुद्धां मी कधीं ढोंग केलं नसतं

नवऱ्याला मोहित करावं म्हणून हंसणं, रुसणं, डोळे मारणं वगैरे ढोंगं मी केलीं असती, पण नुसतं नवऱ्याला मोहित करावं म्हणून खोटं प्रेम दाखवणं माझ्याकरवीं कधींच झालं नसतं. असल्या मातींतून या इंदिरेला घडवली नव्हती देवानं !—

कुणीतरी मेली दळभद्री मला म्हणेल, " गोड गोड हंसून, डोळे मारीत तुला माणसाला झुलवतां येतं, बांधलेले केंस सोडून पुन्हा बांधायचे अन् बोलतां बोलतां त्याचा झटका त्या गरीब बिचाऱ्याच्या गालावर मारून त्याला रोमांचित करायचं हें तुला जमतं—पडलेला पंखा उचलून हातीं द्यायचा किंवा गुडगुडींतल्या चिलमीवर जवळ जाऊन फुंकर घालायची एवढंच तुला माहीत होतं होय ? "— ज्या मेलीच्या तोंडून असा उद्गार निघेल त्या काळतोंडीनं माझं हें आत्मचरित्र वाचूंच नये.

मला माहीत आहे, चार प्रकारच्या चार बायका असतात. पुरुष वाचकांना मी हिशेबांत घेत नाहीं. हें शास्त्र त्या बिचाऱ्यांना कसं कळणार ?—त्या चार बायकांनाच मी नीट समजावून देणार आहें. ते माझे पतिराज—पतिसेवेंतच मला आनंद वाटतोय—तो कृत्रिम नव्हे—अगदीं जीव तोडून मी त्यांची सेवा करतें आहें. मला असं वाटत होतं, कीं यांनीं माझा स्वीकार केला नाहीं तर या जगांत जें कांहीं म्हणून सुखसर्वस्व आहे, जें पूर्वी नव्हतं अन् कदाचित् यापुढं लाभणारही नाहीं, तेवढ्या सुखाचा पुरेपूर वांटा या थोड्या दिवसांपुरता तरी पदरांत पाडून घ्यावा—म्हणुनच एवढी जीव तोडून मी पतिसेवा करीत होतें. त्यांत मला सुखाचा ठेवा केवढा मिळत होता तो तुमच्यापैकीं कुणाला कदाचित कळेल, तर कदाचित कुणाला कळणारही नाहीं.

पुरुष वाचकांना तेवढं हंसण्या मुरडण्याचं रहस्य कळेल—ज्या बुद्धीची मजल कॉलेजांतल्या परीक्षा द्यायच्या सीमेपर्यंत, वकिली करून चार पैसे घरीं आणतां आले कीं आपण विजयी झालों असं समजण्यापर्यंत, सरकारांत मान-मान्यता मिळाली कीं सारी भरपाई झाली, एवढंच समजण्यापुरती ज्यांची अक्कल त्यांना पतिभक्तीचं तत्त्व कळणं मुळींच शक्य नाहीं. जे म्हणतात विधवांचे विवाह लावा, मुली चांगल्या प्रौढ झाल्याशिवाय त्यांचं लग्न करूं नका, मुलींना पुरुषासारखी साऱ्या शास्त्रांत पारंगत करून पंडिता बनवा, असं म्हणण्याइतकी ज्यांची अक्कल त्यांना पतिभक्तिचं इंगित कळणार कसं ?

तरीपण हंसण्यामुरडण्याचं तत्व कळून घेण्याइतकी ते दया दाखवतील. त्याचं कारण एकच, ती अगदीं ढोबळ गोष्ट आहे—अंकुश लावून माहूत हत्तीला वश करतो, कोचमन् चाबुक मारून घोड्याला ताब्यांत ठेवतो, राखणा जशी काठी मारून गुरं अटकावून धरतो, इंग्रज जसा डोळे वटारून बाबूलोकांना काबूंत ठेवतो, तशाच आम्ही बायका हंसून, मुरडून, डोळे मारून तुम्हीं पुरुषांना वश करतों. पतिभक्ति हा आमचा गुण, त्याच्यावर हंसण्यामुरडण्याचा आरोप करून जो तुम्ही खोटा कलंक उत्पन्न करतां तो तुम्हां पुरुषाचा दोष !

तुम्ही म्हणाल, कीं ही झाली अहंकाराची बढाई. तें खरं आहे—आम्ही झालों तरी मातीचींच भांडीं, फुलांच्या घावानं सुद्धां फुटतों. या अहंकारानं इथंच आम्हाला हातोहात मिळतं. ज्या देवाला अंग नाहीं पण ज्याच्या हातीं

आहे, ज्याला आईबाप नाहींत पण बायको आहे, ज्याचे बाण आहेत फुलांचे पण त्यांनीं जो पर्वतसुद्धां कोसळून घालतो, तोच देव आहे बायकांच्या जातीचं गर्वहरण करणारा.

हंसण्यामुरडण्याचा फांस टाकून दुसऱ्याला भाजायला गेलें अन् मीच उलट भाजलें. होळीच्या दिवशीं रंग उडवून दुसऱ्याला रंगवतांना स्वतःच्याच अनुरागानं स्वतःच रंगून गेलें. दुसऱ्याचा खून करायला जातांना स्वतःच फांशी गेलें !

त्यानंतर ही विस्तवाशीं झटापट. मला हंसतां येत होतं पण त्याला कांहीं उलट उत्तर नव्हतं ? मला डोळा मारतां येत होता, पण तसाच उलट कां मारला जाऊं नये ? मला जर त्यांच्या हंसण्यांत, बघण्यांत किंवा कोणत्याही हालचालींत इंद्रियांच्या आकांक्षेचं थोडंबहुत लक्षण दिसलं असतं तर मी विजयी झालें असतें असंच कांहीं नव्हे. तें हंसणं तें पहाणं, ती ओठांची फुरफुर म्हणजे नुसता स्नेह—तें असामान्य प्रेम ! – अर्थात् हरलें ती मीच—हरलें अन् कबूल केलं कीं जगांतलं सोळा आणे सुख म्हणजे हेंच. माणसाच्या देहाशीं ज्या देवतेनं हा संबंध आणून जोडला आहे, त्या देवतेचा देह जळून खाक झाला तेंच अगदीं योग्य झालं

परीक्षेचा काल संपत आला. पण मी त्यांच्या प्रेमांत इतकी गुरफटून गेलें होतें, कीं परीक्षेचा काल संपला अन् त्यांनी मला लाथ मारून घालवून दिलं तरीसुद्धां जायचं नाहीं, असा मी मनाशीं निश्चय केला होता. माझी ओळख पटल्यावर धर्मपत्नी म्हणून त्यांनीं माझा स्वीकार केला नाहीं, रखेली म्हणून त्यांच्यापाशीं रहावं लागलं, तरीसुद्धां राहीन. एकदां पतीची प्राप्ती झाल्यावर लोकलज्जेची पर्वा करणार नाहीं, असं मी म्हणत होतें, पण दुर्दैवानं तेंही जर घडून आलं नाहीं तर ! याच भीतीनं सवड सांपडली कीं मी रडूनही घेत असें.

पण आतां मला कळून चुकलं होतं, कीं माझ्या नवऱ्याचे पंख तुटले होते. आतां उडून जायचं त्राण त्याच्याठायीं राहिलं नव्हतं. त्याच्या अनुरागाच्या आगींत कितीतरी तुपाच्या आहुती पडल्या होत्या. सारीं कामधामं सोडून ते ...े माझ्या तोंडाकडे पाहात राहिले होते. मी घरकाम करीत असतांना एकाद्या ...ग्वे ते माझ्याबरोबर घोटाळत असत. त्यांचं मन अनावर होत असलेलं ...ीं दिसत होतं, पण नुसतं मी खुणावलं तरी ते थंडावत होते.

केव्हां केव्हां ते माझ्या पायाला हात लावून म्हणत, " हा आठवडाभर मी दिलेलं वचन पाळतोंय, पण त्यापुढं मात्र तूं मला टाकून जाऊं नकोस. "

मला आतां कळून चुकलं होतं, कीं मी टाकून गेलें तर त्यांची कांहीं घडगत नाहीं.

परीक्षा पूर्ण झाली. आठवडा संपतांच एक शब्दसुद्धां न बोलतां आम्हीं एकमेकांच्या स्वाधीन झालों. त्यांना वाटलं कीं मी कुलटा—मीं तेंही सहन केलं. कांहीं का होईना, पण एवढं खरं, कीं मी हत्तीच्या पायांत साखळदंड अडकवला हें मात्र मला कळून चुकलं होतं.

● ●

## १७

★ कांहीं दिवसपर्यंत कलकत्त्यांत आम्हीं मोठ्या आनंदांत दिवस काढले. एके दिवशीं हातीं एक पत्र घेऊन एवढसं तोंड करून ते माझ्या समोर आले त्यावेळीं मी त्यांना विचारलं, " असे खिन्न कां ? "

ते म्हणाले, " घराकडून पत्र आलंय. आतां मला घरीं गेलं पाहिजे."

" अन् मी ? " मी चटकन् बोलून गेलें. मी उभी होतें ती मटकन् खालीं बसलें. डोळ्यांवाटे पाण्याच्या धारा लागल्या होत्या. त्यांनीं मोठ्या मायेनं माझा हात धरून मला उठवलं, माझे डोळे पुसले आणि म्हटलं, " त्याच्च काळजींत पडलों होतों मी. तुला सोडून जाऊं कसा ? "

" तिथं माझी ओळख कशी द्याल ? –कोणत्या प्रकारें ? अन् मला कुठं ठेवाल ? "

" त्याचाच्च विचार करतों आहें मी. तें कांहीं शहर नाहीं. तसं असतं तर कुणाला कळणार नाहीं अशा ठिकाणीं तुला ठेवतां आलं असतं. आईबापांच्या नजरेसमोर तुला कुठं ठेवू ? "

" नाहीं गेलं तर नाहीं का चालायचं ? "

" नाहीं — गेलंच पाहिजे. "

" किती दिवसांनीं परत येणार ? लवकर येणार असाल तर मला इथंच ठेवून ना. "

" लवकर फिरून येण्याची खात्री नाहीं. असेच केव्हांतरी येतों आम्ही कलकत्त्याला. "

" तर मग जा तुम्ही. " मी रडत रडत म्हटलं, " मी तुमच्या गळ्यांतली घोरपड होऊन रहाणार नाहीं. असेल माझ्या नशिबीं तसं होईल. "

" पण तूं दिसली नाहींस तर मी पागल होईन." ते म्हणाले.

" असं पहा, मी कांहीं तुमची लग्नाची बायको नाहीं--" असं मी म्हटलं तेव्हां ते चुळबुळ करूं लागले. मी म्हटलं, " तुमच्यावर माझी सत्ता नाहीं. तुम्ही या वेळीं मला निरोप—"

त्यांनीं मला पुढं बोलूं दिलं नाहीं. ते म्हणाले, " आज हें राहूंदे. आज मी विचार करतों आणि उद्यां काय तें सांगतों. "

दुपारीं त्यांनीं रमणबाबूंना भेटायला बोलावलं. त्यांनीं लिहिलं होतं, " गुप्त गोष्टी बोलायच्या आहेत. तुम्ही इथं आल्याशिवाय बोलतां येणार नाहीं. "

रमणबाबू आले. मी दाराआड राहून ऐकत होतें. त्यांनीं रमणबाबूंना विचारलं, " आपली ती सैंपाकीण—पोरगेलीशी आहे ती—तिचं नांव काय ? "

" कुमुदिनी. " रमणबाबू म्हणाले.

" तिचं घर कुठं ? "

" सध्यां सांगतां येत नाहीं. "

" सधवा कीं विधवा ? "

" सधवा. "

" तिचा नवरा कोण तो माहीत आहे का तुम्हाला ? माहीत आहे ? कोण तो ?"

" सध्यां मला सांगायला मनाई आहे. "

" कां ? कांहीं गुप्त रहस्य आहे का ? "

" आहे. "

" ती तुम्हांला कुठं सांपडली ? "

" माझ्या बायकोनं तिला आपल्या मावशीकडून आणली. "

" जाऊं दे तें. चालचलणूक कशी आहे तिची ? "

" अगदीं धुतलेल्या तांदुळासारखी. मात्र आमच्या म्हाताऱ्या सैंपाकणीला ती सारखी सतावते. याखेरीज कोणताच दोष नाहीं."

" स्त्रीजातीच्या चारित्र्यदोषाबद्दल मी विचारतोंय."

रमणबाबू म्हणाले, " तेंच मी सांगतोंय. इतकं उत्कृष्ट चारित्र्य शोधून सांपडायचं नाहीं."

" तिचं घर कुठं आहे तें कां सांगत नाहीं तुम्ही ?"

" तें सांगायला बंदी आहे मला."

" तिच्या नवऱ्याचं घर कुठं आहे ?"

" उत्तर तेंच."

" नवरा हयात आहे का ?"

" आहे."

" त्याला ओळखतां का ?"

" हो, ओळखतों."

" ती बाई हल्लीं कुठं आहे ?"

" याच आपल्या घरीं."

माझे नवरोजी दचकले. अचंबित होऊन त्यानीं विचारलं, " हें तुम्हाला कसं कळलं ?"

" तें मला सांगतां येत नाहीं." रमणबाबू म्हणाले, " आपलं जबानी घेणं संपलं का ?"

" संपलं !" उ-बाबू म्हणाले, " पण मी हें तुम्हाला कां विचारतों आहें हें तुम्ही कुठं विचारलं नाहीं मला ?"

" याला दोन कारणं आहेत." रमणबाबू म्हणाले, " पहिलं हें—मी विचारलं तरी तुम्ही सांगणार नाहीं ! खरं ना ? दुसरं, तुम्ही कां विचारतां तें मला माहित आहे."

" तेंसुद्धां माहित आहे ? मग सांगा पाहूं काय तें."

" तें मी सांगणार नाहीं."

" ठीक आहे !" उ-बाबू म्हणाले, " तुम्हाला सारं कांहीं माहित आहे

असं दिसतं. आतां माझा जो बेत आहे तसं जमून येईल कीं नाहीं तें मला सांगा."

"तसं जमून येणं चांगलंच शक्य आहे. तुम्ही कुमुदिनीलाच विचारा."

"आणखी एक प्रश्न आहे." उ-बाबू म्हणाले, "कुमुदिनीबद्दल तुम्हाला जी जी कांहीं माहिती आहे ती लिहून खालीं तुमची सही करून द्याल का मला?"

"देईन—पण एका अटीवर—" रमणबाबू म्हणाले, "मी सारं कांहीं लिहून लखोटा बंद करून कुमुदिनीपाशीं देईन. तुम्ही तो यावेळीं वाचायचा नाहीं. आपल्या गांवीं गेल्यावर वाचायचा. आहे कबूल?"

ते बराच वेळ विचार करून म्हणाले, "कबूल--पण माझ्या बेताला पोषक होईल ना तें?"

"होईल." रमणबाबू म्हणाले.

थोड्या वेळानं रमणबाबू गेले तेव्हां उ-बाबू माझ्यापाशीं आले, तेव्हां मी त्यांना विचारलं, "ही कसली जबानी चालली होती? कशासाठीं?"

"तूं ऐकलंस ना सारं?" ते म्हणाले.

मी म्हटलं, "हो, मी ऐकलं. मी असं म्हणत होतें, खून करून मी फांशी गेलेंय. फांशी गेल्यावर मग चौकशी कशाला ही?"

ते म्हणाले, "इथल्या कायद्याप्रमाणें तसं होत असतं."

• •

## १८

★ त्या दिवशीं साऱ्या दिवसभर अन् रात्रभर अस्वस्थपणें ते विचार करीत होते. माझ्याशीं नीटसं बोलतसुद्धां नव्हते. मी समोर दिसलें तर माझ्या तोंडाकडे पहात रहात. त्यांच्यापेक्षां मलाच जास्त काळजी लागली होती, पण स्वतःचं दुःख विसरून मी त्यांनाच खूष ठेवायचा प्रयत्न करीत होतें. फुलं गुंफून देत होतें, विडा करून देत होतें, गोडगोड खायचे जिन्नस करून देत होतें, आंतून रडण्याचा उमाळा येत होता तरी तोंडभर

हंसून गोडगोड गोष्टी बोलत होतें, पण त्याचा कांहीं उपयोग होत नव्हता. मला मात्र रडायचे उमाळ्यावर उमाळे येत होते.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहा फराळ झाल्यावर त्यांनी मला जवळ घेऊन बसवलं आणि म्हटलं, " मी आतां विचारीन त्याचीं खरीं खरीं उत्तरं देशील का ? "

मी म्हटलं, " जें सांगेन तें खरं सांगेन, पण साऱ्याच प्रश्नांचीं उत्तरं कदाचित नाहीं देतां यायचीं. "

त्यांनीं विचारलं, " तुझा नवरा हयात आहे असं मला कळलंय. त्याचं नांव गांव सांगशील का ? "

" सध्या नाहीं. पुढं केव्हांतरी सांगेन. "

" तो सध्या कुठं असतो ? "

" या कलकत्त्यांतच. "

ते थोडेसे दचकले आणि म्हणाले, " तूं आहेस कलकत्त्यांत, तुझा नवराही आहे कलकत्त्यांत, मग तूं त्याच्याकडे कां जात नाहींस ? "

" त्यांची माझी ओळख नाहीं. " मी म्हटलं.

मी खरं तेंच सांगत होतें, पण माझ्या नवऱ्याला तें माझं उत्तर ऐकून आश्चर्य वाटलं. त्यांनीं विचारलं, " नवऱ्याची आणि बायकोची ओळख नाहीं ? मोठं आश्चर्य आहे ! "

" सर्वांनाच असते का ओळख ? " मी म्हटलं, " तुम्ही ओळखतां का तुमच्या बायकोला ? "

ते थोडेसे ओशाळून म्हणाले, " दुर्दैवानं तसं झालंय खरं. "

" दुर्दैव सर्वत्रच असतं की ! " मी म्हटलं.

" जाऊं दे तें. " ते म्हणाले, " पुढं केव्हांतरी तो तुझा नवरा तुझ्यावर हक्क सांगायला येईल का ? "

" तें माझ्याच हातीं आहे, " मी म्हणालें, " मी जर त्यांना माझी ओळख दिली तर काय होईल तें सांगतां यायचं नाहीं. "

" तर मग तुला आतां सारं कांहीं फोड करून सांगतों. " ते म्हणाले, " तूं

चांगलीच हुषार आहेस हें आतां मला कळून चुकलंय. आतां या बाबतींत तुझा काय सल्ला आहे मला ? ”

“ कोणत्या बाबतींत ? ”

“ मला घरीं गेलं पाहिजे. ”

“ तें आतां कळलं. ”

“ घरीं गेलं तर लवकर येतां यायचं नाहीं. ”

“ तेंही कळलं. ”

“ तुला टाकून जाणं शक्य नाहीं. तुला सोडून गेलों तर प्राण जाईल माझा.”

माझा प्राण कंठाशीं आला होता तरीही चांगलं तोंडभर हसून मी म्हटलं “ नशिब ! शितं फेकलीं तर कावळ्यांना काय तोटा ? ”

“ कोकिळेची उणीव कावळ्यानं भागत नाहीं. ” ते म्हणाले, “ तुला घेऊन जाणार मी बरोबर. ”

“ कुठं ठेवाल ? मी कोण म्हणून सांगाल ? ”

“ कांहींतरी लबाडी केली पाहिजे.” ते म्हणाले, “ काल सारा दिवस विचार करीत होतों म्हणुनच तुझ्याबरोबर बोललों नाहीं. ”

“ त्यांना असं सांगा, कीं हीच इंदिरा. रामरामदत्तांच्या घरून शोधून आणली आहे ! ”

“ म्हणतेस काय ? ” ते दचकून ओरडले, “ कोण तूं ? ” डोळे तारवटून ते ताठरून माझ्याकडे पहात होते. मी विचारलं, “ कां ? काय झालं ? ”

“ तिचं नांव इंदिरा हें तुला कसं कळलं ? ” ते म्हणाले, “ अन् माझ्या मनांतला गुप्त बेतसुद्धां तुला कसा उमगला ? कोण आहेस तूं ? माणूस कीं मायाविनी ? ”

“ तें काय तें मागाहून सांगेन. ” मी म्हटलं, “ आधीं मी विचारतें त्याचं सरळ सरळ उत्तर द्या. ”

ते घाबरून म्हणाले, “ विचार.”

मी म्हटलं, “ त्या दिवशीं तुम्ही मला सांगितलं कीं आपली बायको सांपडली तरी तिला मी घरीं घेणार नाहीं. डाकूनीं पळवून नेलेली बायको घरीं घेतली तर

आपली जात बुडेल—मग मी इंदिरा म्हणून घरीं घेऊन गेलां तर ती भीति नाहीं का ?"

"ती भीति नाहीं कशी ?" ते म्हणाले, "ती भीति तर आहेच, पण मी तसं सांगितलं तेव्हां ती जिवाभावाची गोष्ट नव्हती. आतां प्राणावर बेतली आहे—जात मोठी कीं प्राण मोठा ? अन् तसं पाहिलं तर त्यांतसुद्धां फारसं बिकट कांहीं नाहीं. इंदिरा जातिभ्रष्ट झाली आहे असं अजून कांहीं कुणी म्हटलं नाहीं. काळीदिघीला ज्यांनीं दरवडा घातला ते डाकू पकडले गेले होते. त्यांनी आपल्या जबानींत सांगितलं होतं, कीं तिचे दागिने काढून घेऊन तिला टाकून आम्ही निघून गेलों. ती कुठं आहे किंवा तिचं काय झालं तें कांहीं कुणाला माहीत नाहीं. अर्थात ती सांपडली तर तिला कसलाच कलंक लागलेला नाहीं असं ठरवणं कठिण जायचं नाहीं. रमणबाबू जें कांहीं लिहून देणार आहेत त्यांत याला पोषक असं कांहींतरी असेल असं मला वाटतंय. याही उपर गांवच्या लोकांनीं कांहीं गडबड केली तर त्यांची मूठ दाबून त्यांचं तोंड बंद करतां येईल. माझ्यापाशीं पैसा आहे—पैशाच्या जोरावर वाटेल त्याला वश करतां येतं."

"ही अडचण जर दूर झाली आहे, तर मग आतां हरकत कसली ?"

"हरकत आहे तुझ्याबद्दलची." ते म्हणाले, "तूं बनावट इंदिरा आहेस हें उघडकीस आलं तर ?"

मी म्हटलं, "तुमच्या घरीं मला कुणी ओळखीत नाहीं. अस्सल इंदिरेलाही कुणी ओळखीत नाहीं—कारण तिला त्यांनीं पाहिली होती अगदीं लहान असतांना—मग उघडकीस यायची भीती कसली ?"

"बोलाचालीची." ते म्हणाले, "अपरिचित माणूस परिचित म्हणून गेलं तर बोलतां चालतांना गोत्यांत येईल."

"तर मग तुम्ही मला सारं कांहीं पढवून ठेवा."

"तेंच मी ठरवलं होतं." ते म्हणाले, "पण सारंच कांहीं पढवतां येत नाहीं. मी तुला सांगितली नाहीं अशी एकादी गोष्ट निघाली तर पकडली जाशील. समज, खरी इंदिरा येऊन हजर झाली अन् दोघांची जबानी घेतली तर जुन्या गोष्टी निघाल्यावर तूं उघडकीस येशील."

मी उगीच थोडीशी हंसलें. अशा वेळीं आपोआपच हंसू येतं. अजून माझी खरी ओळख दाखवायची वेळ आली नव्हती.

मी पुन्हा हंसलें आणि म्हटलं, "कुणाची शहामत नाहीं मला ओळखायची! आतांच तुम्ही विचारलंत, कीं मी माणूस कीं मायाविनी?—मी माणूस नाहीं—( तें ऐकून ते शहारले ) मी कोण तें तुम्हाला मग सांगेन. सध्यां मी एवढंच सांगतें, कीं मला चकवायची कुणाची प्राज्ञा नाहीं."

माझे नवरोजी स्तंभित झाले. बुद्धिमान अन् कामसू माणूस–नाहींतर इतक्या दिवसांत त्यांनीं इतकी संपत्ती कशी मिळवली असती? दिसायला बाहेरून नीरस-साधारण अरसिकच–पण आंतून भारी मधूर, भारी कोमल, भारी मायाळू! रमणबाबूंप्रमाणे किंवा अलिकडच्या चार तरुणांप्रमाणें त्यांना उच्च शिक्षण मिळालं नव्हतं. देवदेवतांवर त्यांचा विश्वास होता. गांवोंगांव फिरत असतांना भूतप्रेत, डाकिनी योगिनी याच्या गोष्टी त्यांनीं ऐकल्या होत्या. त्या गोष्टींवर त्यांचा विश्वास होता. मी माणूस नाहीं असं म्हटलं तेंही एकप्रकारें त्यांना पटलं होतं. त्यामुळें ते स्तंभित झाले—थोडेसे घाबरलेही. तरीपण उसनं अवसान आणून ते म्हणाले, 'तूं कशी मायाविनी आहेस त्याची आतां परीक्षा घेतों. आतां सांग—माझ्या बायकोचं नांव इंदिरा हें तूं सांगितलंस. आतां तिच्या बापाचं नांव सांग."

"बापाचं नांव हरमोहन दत्त."

"त्यांचं घर कुठं आहे?"

"महेशपूरला."

"तूं म्हटलंस कीं तुझ्या बापाचं घर आहे काळीदिघीला,—काळीदिघीला तुला हें कळलं असेल. आतां सांग, हरमोहन दत्तांच्या घराचा सदर दरवाजा कोणत्या दिशेला आहे?"

"दक्षिण दिशेला. घरासमोर मोठं फाटक आहे अन् त्याच्या खांबावर दोन मोठे सिंह आहेत."

"त्यांना किती मुलगे आहेत? त्यांचीं नांवं काय?"

"त्यांना एकच मुलगा आहे. त्याचं नांव वसंतकुमार."

"अन् मुली किती अन् त्यांचीं नांवं काय?"

"तुमच्या लग्नाच्यावेळीं दोनच मुली होत्या—एक इंदिरा आणि कामिनी."

" इंदिरेचं कन्यादान कुठं झालं ? "

" पूजेच्या दालनाच्या उत्तर पश्चिम कोंपऱ्यांत."

" कुणी कन्यादान केलं ? "

" इंदिरेचे काका कृष्णमोहन दत्त यांनीं ! "

" लग्नाच्यावेळीं एका बाईनं जोरानं माझा कान पिरगळला होता. तिचं नांव सांग पाहूं ? "

" बिंदू ठाकूराणी — एक मोठ्या मोठ्या डोळ्यांची, तांबड्या तांबड्या जाड ओंठांची बाई — भली मोठी नथ असे तिच्या नाकांत. "

ते जरासे हंसले आणि म्हणाले, " लग्नाच्या दिवशीं तूं हजर असशील कदाचित् ! त्यांची कुणी नातेवाईक आहेस का ? "

मी म्हटलं, " कुणी नातेवाईक, कामवाली, सपाकीण, असल्या कुणातरी बायांना माहित नसतील असे प्रश्न विचारा. "

ते क्षणभर थांबले आणि म्हणाले, " रागावणार नाहींस तर एकदोन प्रश्न विचारतों. लग्न लागून सासरघरांत गेल्यावर एकटीच असतांना मी इंदिरेला कांहीं विचारलं आणि तिनंही कांहीं उत्तर दिलं, तें काय तें सांग पाहूं."

उत्तर द्यायला मला थोडासा वेळ लागला. ती आठवण झाल्याचा माझ्या मनावर परिणाम होऊन मला उमाळा येत होता तो मी आवरूं पहात होतें. त्यावेळीं ते म्हणाले, " आतां मात्र घसरलीस ! तूं कांहीं मायाविनी नव्हेस ! "

डोळ्यांतलीं आसवं डोळ्यांनींच गिळून मी म्हटलं, " तुम्ही इंदिरेला विचारलंत, ' सांग पाहूं आजपासून तुझं माझं नातं कोणतं ? ' इंदिरा म्हणाली, ' आजपासून तुम्ही माझे परमेश्वर, मी तुमची दासी.' — आणखी कांहीं विचारायचं आहे ? "

" आणखी विचारायला मला भीति वाटते. " ते म्हणाले, " मी भांबावून गेलों आहें. तरी पण विचारतों — फुलशय्येच्या दिवशीं इंदिरेनं थट्टेथट्टेनं मला गाळी दिल्या होत्या — त्याबद्दल मीही तिला कांहीं शिक्षा केली होती — तें काय तें सांग पाहूं ? "

मी म्हटलं, " तुम्ही आपल्या एका हातानं इंदिरेचा हात धरला आणि दुसरा हात तिच्या खांद्यावर ठेवून तिला विचारलंत, ' इंदिरे, सांग पाहूं, मी

तुझा कोण ?' त्यावर इंदिरेनं उत्तर दिलं, 'मी ऐकलंय, कीं तुम्ही माझ्या नणंदेचे वर !' तुम्ही चिडून तिच्या गालावर एक चापटी मारलीत--लगेच ओशाळलांत आणि—आणि तिचं चुंबन घेतलंत !' तें सांगत असतांना माझ्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले होते—माझ्या आयुष्यांतलं तें पहिलं मुखचुंबन—त्यानंतर सुभाषिणीनं केलेली ती सुधावृष्टी. मधल्या काळांत घोरतर अनावृष्टि—सारं हृदय कोरडं ठणठणीत होऊन त्याला तडे गेले होते.

याच गोष्टीवर मी विचार करीत होतें त्यावेळीं माझे पतिराज डोळे मिटून उशीवर डोकं टेकून पडले होते. मी म्हटलं, "आणखी कांहीं विचारायचं आहे का ?"

ते म्हणाले, "नाहीं. एकतर तूंच इंदिरा आहेस किंवा कुणीतरी जादुगारीण आहेस."

• •

## १९

★ यावेळीं ओळख देतां आली असती, पण इतक्यांत ओळख दाखवायची नाहीं असं ठरवलं होतं. मी म्हटलं, "आतां मी तुम्हाला माझी एक ओळख देतें. माझं अधिष्ठान कामरूपांत. मी आद्याशक्तीच्या महामंदिरांत तिच्याच मागल्या बाजूला असतें. लोक आम्हाला डाकिणी म्हणतात, पण आम्हीं आहोंत विद्याधरी. महामायेची अवज्ञा केली म्हणून तिच्या शापानं मनुष्यदेह घ्यावा लागला—सैंपाकीण व्हावं लागलं तें भगवतीच्या शापामुळंच. आतां शापमुक्त व्हायची वेळ आली आहे. महाभैरवीचं दर्शन केलं कीं आम्हांला मुक्ती मिळेल."

त्यांनीं विचारलं, "कुठं आहे ती महाभैरवी ?"

"महाभैरवीचं मंदीर आहे महेशपुरांत," मी म्हटलं, "तुमच्या सासुरवाडीच्या उत्तरेला. चला आतां महेशपूरला जाऊं."

क्षणभर विचार करून ते म्हणाले, "मला वाटतं तूं माझी इंदिराच. कुमुदिनी म्हणजेच इंदिरा असं ठरलं तर माझ्यासारखा सुखी कोण ठरेल या त्रिभुवनांत ?"

"कोण का ठरेना," मी म्हटलं, "महेशपूरला गेलं कीं सारा तंटा मिटेल."

"तर मग चल. उद्यांच इथून निघूं." ते म्हणाले, "काळीदिघी पार करून तुला महेशपूरला पाठवून देतों अन् मी एकदां माझ्या घरीं जाऊन एक दोन दिवसांत महेशपूरला येतों. तूं इंदिरा ऐस, कुमुदिनी ऐस कीं, विद्याधरी ऐस, मी तुला विनवून सांगतों, कीं यापुढं मला टाकून जाऊं नकोस."

मी म्हटलं, "माझ्या शापाचा शेवट झाला कीं देवीच्या कृपेनं मला तुमचा लाभ होईल. तुम्हीं मला प्राणाहुनही प्रिय झाला आहां."

"ही कांहीं डाकिणीची भाषा नव्हे!" असं म्हणून ते बाहेर गेले. बाहेर कुणीतरी आलं होतं. दुसरं कुणी नव्हे—रमणबाबू. माझ्या नवऱ्याबरोबर रमणबाबू आंत आले आणि एक सीलबंद लखोटा माझ्या हातीं देऊन निघून गेले. माझ्या नवऱ्याला काल त्यांनीं जें सांगितलं होतं तेंच त्यांनीं मला सांगितलं. शेवटीं त्यानीं विचारलं, "सुभाषिणीला काय सांगूं?"

मी म्हटलं, "तिला सांगा, उद्यां मी महेशपूरला जातें आहें. तिथं गेलें कीं मी शापमुक्त होईन." माझ्या नवऱ्यानं त्यांना विचारलं, "हें सारं कांहीं माहित आहे का तुम्हाला?"

रमणबाबू चतुर माणूस. ते म्हणाले, "मला सारं कांहीं माहित आहेच असं नाहीं, पण माझ्या बायकोला मात्र खडानूखडा माहिती आहे."

बाहेर गेल्यावर त्यांनीं रमणबाबूंना विचारलं, "डाकिनी, योगिनी, विद्याधरी, यांच्यावर तुमचा विश्वास आहे का?"

रमणबाबूंनीं अंदाजानं ताडलं. ते म्हणाले, "आहे तर! सुभाषिणी म्हणते कीं कुमुदिनी ही शापभ्रष्ट विद्याधरी आहे."

ते म्हणाले, "एकदां आपल्या पत्नीला विचाराल का, कीं ही कुमुदिनी आहे कीं इंदिरा आहे?"

रमणबाबू उत्तर द्यायला थांबले नाहींत. हंसत हंसत तसेच चालते झाले.

● ●

## २०

योग्यवेळीं आम्ही दोघंही कलकत्त्याहून जायला निघालों. ती हतभागी काळीदिघी पार झाल्यावर ते मला सोडून आपल्या गांवाकडे निघून गेले. बरोबरचीं माणसें मला महेशपूरला घेऊन गेलीं. भोई आणि दरवान यांना गांवाच्याबाहेरच थांबायला सांगून मी पायीपायींच गांवांत गेलें. समोर माझं माहेरघर दिसतांच एका एकांत जागीं बसून आधीं मी पोटभर रडून घेतलं अन् त्यानंतर घरांत गेलें.

समोरच बाबा दिसतांच मी त्यांना प्रणाम केला. मला पहातांच ते आनंदानं बेहोष झाले. त्या साऱ्या हकिकतीचं वर्णन इथं कशाला? इतके दिवस मी कुठं होतें, कशा प्रकारें आलें, तें मी कांहींच सांगितलं नाहीं. आई-बाबांनीं विचारलं तेव्हां मी म्हटलं, " मग केव्हांतरी सांगेन. "

नंतर मी त्यांना माझी हकिकत सांगितली ती नुसती ठोकळ प्रमाणांत. तपशिलवार कांहींच सांगितलं नाहीं. सांगितलं तें एवढंच, कीं शेवटीं मी माझ्या नवऱ्यापाशींच होतें अन् तिथूनच आलें आहें. एकदोन दिवसांत तेही येणार आहेत. मी सारी हकिकत सांगितली ती कामिनीला. कामिनी माझ्यापेक्षां दोन वर्षांनीं लहान होती. ती मोठी थट्टेखोर होती. ती म्हणाली, " आक्का, हे मित्रबाबू जर एवढे गोबरगणेश आहेत तर आपण त्यांची थोडी गंमत करूंया. "

मी म्हटलं " माझाही बेत तोच आहे. "

आम्ही दोघींनी मिळून बेत आंखला. सर्वांना शिकवून ठेवलं. आईला अन् बाबांनासुद्धां थोडं शिकवावं लागलं. अजून उघडपणें त्यांनीं माझा स्वीकार केलेला नाहीं, तो विधी इथंच व्हायचा आहे, असं कामिनीनं आईबाबांना सांगितलं. अर्थात जांवईबाबू आले तर मी इथं आलें आहें हें त्यांना कळूं न देण्याबद्दल आईबाबांना बजावून ठेवलं.

दुसऱ्या दिवशीं जांवईबाबू आले. आईबाबांनीं त्यांचं मोठ्या थाटांत स्वागत केलं. मी आल्याची खबर त्यांना मुळींच कळूं दिली नाहीं—तसं विचारणंही त्यांना कठिण जात होतं.

फराळासाठीं ते आंत आले त्यावेळीं त्यांचा चेहरा उतरला होता. मी त्यावेळीं समोर गेलें नाहीं. कामिनी आणि शेजारच्या चार दोन मुली तेवढ्या आल्या होत्या. संध्याकाळ होऊन गेली होती. कामिनी त्यांना कितीतरी प्रश्न विचारीत होती अन् ते यंत्रासारखे उत्तरं देत होते. मी आड उभी राहून सारं कांहीं ऐकत पहात होतें. शेवटीं त्यांनीं कामिनीला विचारलं, "तुझी अक्का कुठं आहे?"

एक मोठा सुस्कारा सोडून कामिनी म्हणाली, "कोण जाणे कुठं आहे ती! काळीदिघीला तो दरोडा पडल्यानंतर तिची कांहींच खबर मिळाली नाहीं."

एवढंसं तोंड करून ते स्वस्थ बसले. त्यांच्यानं पुढं बोलवेना. कुमुदिनी हातची निसटली अशी कल्पना करून त्यांच्या डोळ्यांतून आसवं गळूं लागलीं होतीं. डोळ्यांतलीं आसव पुसून त्यांनी विचारलं, "कुमुदिनी नांवाची कुणी बाई इथं आली होती का?"

कामिनी म्हणाली, "कुमुदिनीच कीं काय तें सांगतां येत नाहीं, पण परवां एक बाई मेण्यातून आली होती खरी. ती सरळ महाभैरवीच्या मंदिरांत गेली अन् तिनं देवीला प्रणाम केला. तितक्यांत एक चमत्कार झाला. आकाशात ढग आले अन् सोसाट्याचा पाऊस पडूं लागला अन् त्याचवेळीं ती स्त्री हातांत त्रिशूळ घेऊन आकाशांत झगझगत जाऊन दिसेनाशीं झाली."

फराळाचं तसंच राहिलं. हात धुवून ते बराच वेळ डोक्यावर हात घेऊन स्वस्थ बसले बसले होते. बऱ्याच वेळानं त्यांनीं विचारलं, "कुमुदिनी ज्या जागीं अंतर्धान पावली ती जागा दाखवशील का मला?"

"दाखवीन तर!" कामिनी म्हणाली, "काळोख पडलाय. जरा कंदील घेऊन येतें." असं म्हणून ती माझ्याकडे आली अन् मला खूण करून म्हणाली, "तूं आधीं जा. त्यानंतर मी कंदील घेऊन उपेंद्रबाबूंना घेऊन येतें."

मी आधींच देवळांत गेलें आणि चौथऱ्यावर बसून राहिलें.

कंदील घेऊन कामिनी माझ्या पतिराजांना घेऊन तिथं आली. मला पाहातांच त्यांनीं एकदम माझ्या पायापाशीं झमकण मारली आणि म्हटलं, "कुमुदिनी— कुमुदिनी—आतां आली आहेसच—आतां मला टाकून जाऊं नकोस."

चार दोन वेळ ते असंच म्हणाले तेव्हां कामिनी चिडून मला म्हणाली,

" चल आक्का, ऊठ आतां. हे राजश्री कुमुदिनीला ओळखतात. तुला ओळखत नाहींत. "

ते बावरून म्हणाले, " आक्का ! आक्का कोण ? "

कामिनी रागारागानं म्हणाली, " माझी आक्का—इंदिरा—कधीं ऐकलं नव्हतं का हें नांव ? " असं म्हणून त्या मेलीनं दिवा मालवून टाकला अन् माझा हात धरून तिनं मला ओढून नेलं. आम्ही दोघीही खूप धांवत पळत होतों. ते भानावर आले तेव्हां आमच्या मागोमाग यायला निघाले. काळोख पडलेला—अनोळखी रस्ता—कुठंतरी ठेंच लागून ते खालीं पडले. आम्ही जवळपास होतों. दोघींनींही दोन हात धरून त्यांना उठवलं. कामिनी हळुच म्हणाली " आम्ही आहों विद्याधरी. तुमच्या संरक्षणासाठीं तुमच्या पाठोपाठ येत असतों. " असं म्हणून त्यांना ओढून आणून तिनं माझ्या शेजघरांत आणून बसवलं. तिथं दिवा होता. आम्हाला पाहातांच ते म्हणाले, " हें काय ? ही कामिनी अन् ही तर कुमुदिनी. "

कामिनी एकदम भडकून उठली आणि म्हणाली, " तुमचं डोंबल ! हीच का तुमची अक्कल ? याच अकलेच्या जोरावर काय पैसा रोजगार केलात ? कळलं ?—ही कुमुदिनी नव्हे—इंदिरा ! इंदिरा ! इंदिरा !—तुमची बायको ! आपल्या बायकोचीसुद्धां ओळख नाहीं तुम्हांला ? "

माझे पतिराज आनंदानं बेहोष झाले. मला जवळ ओढून घेण्यासाठीं पुढं सरसावले पण त्यांनीं कामिनीलाच मिठी मारली. मेली त्यांच्या गालावर एक थप्पड मारून तिथून चालती झाली.

त्या दिवशीं सर्वांच्या आनंदाला पारावर नाहींसा झाला. घरांत जिकडे तिकडे उत्सव सुरू झाला. त्या रात्रीं कामिनीचं आणि उ-बाबूंचं शंभर वेळ वाग्युद्ध झालं. प्रत्येकवेळीं हार घेत होते ते उ-बाबू.

• •

## २१

★ दुसऱ्या दिवशीं मी माझ्या पतिराजांबरोबर मेण्यांत बसून सासुरवाडीला गेलें. नवऱ्याबरोबर प्रवास करण्यांत आनंद असतो खरा; पण आतांच्या या आनंदाचं स्वरूप न्यारंच होतं. कधीं मिळालं

नव्हतं तें मिळवायच्या आशेनं निघालें होतें. आतां जें पदरांत पडलं तें पदराच्या गांठीला बांधून जायला निघालें. पहिलं कवीचं काव्य— दुसरं धनवानाचं धन ! धनवानाचं धन अन् काव्य हीं सारखींच का ? पैसा मिळवतांना माणूस म्हातारा होतो, काव्य हरवून बसतो, तो सुद्धां असं म्हणत नाहीं. तो म्हणतो, फुललेलं फूल झाडावर असतं तोंवरच तें सुन्दर—खुडून काढलं कीं त्याचं सौंदर्य गेलं. गोड स्वप्न पडलं तर आनंद होतो, पण तें स्वप्न सफल झालं तर तेवढा आनंद वाटतो का ? आकाश हें कांहीं खरोखर निळं नाहीं, आम्हाला निळं आहेसं वाटतं—धनाचं ही तसंच. पैशांत सूख नाहीं, पण त्यांत सूख आहे असं आम्ही धरून चालतों. सुख आहे तें काव्यांत. काव्य म्हणजे आशा—धन म्हणजे नुसता भोग—तोही कुठं असतो सर्वांच्याच कपाळीं ? पुष्कळसे धनवान असतात तिजोरीचे पहारेकरी— आमचा एक दोस्त म्हणतो—'ट्रेझरी गार्ड' !

तरीपण मोठ्या आनंदांत मी सासुरवाडीला निघालें. यावेळीं निर्विघ्नपणें मुक्कामाला पोंचलें. माझ्या पतिराजांनीं आपल्या आईबापांना सारी हकीकत तपशिलवार सांगितली. रमणबाबूंनीं दिलेला लखोटा फोडून वाचला. त्यांत तीच हकिकत होती. माझ्या सासूसासऱ्यांचं समाधान झालं. गांवच्या लोकांनां सारी हकिकत कळली तेव्हां त्यांनींही कांहीं गडबड केली नाहीं.

आतांपर्यंत झालेल्या साऱ्या हकिकतीचं तपशीलवार पत्र लिहून सुभाषिणी-कडे पाठवलं, सुभाषिणीसाठीं माझा जीव सारखा तळमळत होता. माझ्या सांगण्याप्रमाणें माझ्या पतिराजांनीं हाराणीला देण्यासाठीं रमणबाबूंकडे पांचशे रुपये पाठवले.

सुभाषिणीचं उत्तर आलं. त्यांत तिनं लिहिलं होतं, "हाराणी कांहीं केल्या पैसे घेईना. ती म्हणाली, 'अशानं माझा लोभ वाढेल. मी कांहीं पैशाच्या आशेनं तें काम केलं नव्हतं.' मी त्या काळतोंडेला सांगितलं, 'माझ्या हातची झाडू खाल्ली नसतीस तर केलं असतस का तें काम ? अशी उठल्या सुटल्या माझ्या हातची झाडू खायला मिळते का तुला ? वाईट काम असतं तर मी कशाला झाडू मारायला गेलें असतें. आतां दोन शिव्या खायच्या आहेत का माझ्या तोंडच्या ? चांगलं काम केलंस, आतां घे त्याचं बक्षिस.' अशी नाना

प्रकारें तिची समजूत घातली तेव्हां तिनं ते पैसे घेतले. आतां कसलीं तरी व्रतं वैकल्यं करायचा संकल्प केला आहे तिनं ती तुझ्याकडची खबर आली नव्हती तोंपर्यंत तिचं हंसणंसुद्धां बंद झालं होतं, पण आतां तिच्या हंसण्याच्या धुमाळीनं घरांतलीं सारीं माणसं बेजार झालीं आहेत.

म्हाताऱ्या सैंपाकणीच्या बाबतींत सुभाषिणीनं लिहिलं होतं, "तूं गुपचुप आपल्या नवऱ्याबरोबर गेलीस तेव्हांपासून म्हातारी उसळून उठून म्हणे, 'मला अगदीं पक्कं माहीत होतं, कीं ही बाई कांहीं बरी नव्हे. तिची चालचालणुकच बरी नव्हती. असली बेढंगी बाई तुम्हीं ठेवूं नका म्हणून मी कितीवेळ सांगितलं, पण माझं गरिबाचं सांगणं ऐकतो कोण ? सारे 'कुमुदिनी—कुमुदिनी' म्हणून तोखणी करीत होते. असंच कांहीं तरी सारखी बडबडे. पण आतां जेव्हां तिला कळलं, कीं तूं भलत्याच कुणाबरोबर गेली नाहींस, नवऱ्याबरोबरच गेली आहेस, मोठ्या घरची मुलगी अन् मोठ्या माणसाची बायको—घर आणि वर मिळाला असं कळलं, तेव्हां ती म्हणाली, 'मी तर अगदीं नक्की सांगत होतें, थोरा-मोठ्या घरची मुलगी ती—हलक्यासलक्या माणसांत काय असल्या स्वभावाचीं माणसं मिळतात ? जसं रूप तसे गुण. जशी कांहीं लक्ष्मी ! कल्याण होओ बिचारीचं !—देव भलं करो ! अन् असं पहा सुनबाई, मला कांहीं तरी पाठवायला सांगा तिला.'"

आपल्या सासूसंबंधीं सुभाषिणीनं लिहिलं होतं. "तुझी सारी हकीकत ऐकून सासूबाईना आनंद झाला.

"पण त्यांनीं मला आणि र—बाबूला चांगलंच छेडलं त्या म्हणाल्या, 'अरे थोरामोठ्या घरची मुलगी—तुम्ही लोकांनीं मला आधीं कसं सांगितलं नाहीं ! खूप कोडकौतुक केलं असतं मी तिचं !' अन् तुझ्या नवऱ्याला उद्देशून त्यानीं चार शिव्या दिल्या आणि म्हटलं, 'असेना का त्याची बायको ! आमची ही अशी छान सैंपाकीण तो घेऊन गेला हें कांहीं बरं केलं नाहीं त्यानं.'"

"तिचे सासरे रामरामदत्त—त्यांच्याबद्दल तिनं लिहिलं होतं, "मामंजीनीं सासूबाईना खोटाच राग आणून म्हटलं, 'तूं कांहीं तरी खोटीं निमित्तं काढून आमच्या सुंदर सैंपाकणीला घालवून दिलंस !' सासूबाई म्हणाल्या, 'छान केलं ! सुंदरी घेऊन काय धुवून खाणार होतां ?'

" मामंजी म्हणाले, ' तें कुणी सांगावं ! रात्रंदिवस या कृष्णमूर्तीचं ध्यान करणं मोठं कठीण जातं मला ! ' त्याबरोबर सासूबाईनीं बिछान्यावर अंग टाकलं. त्या सबंध दिवसांत त्या उठल्या नाहींत. मामंजींची ती थट्टा होती हें कांहीं केल्या त्यांना पटेना. "

म्हाताऱ्या सैंपाकीणबाई आणि इतर नोकरचाकर यांना मी कांहीं ना कांहीं पाठवून दिलं हें कांहीं सांगायला नको.

त्यानंतर सुभाषिणीची फक्त एकदांच भेट झाली. तिनं आग्रह केल्यावरून तिच्या मुलीच्या लग्नाच्या वेळीं माझे पतिराज मला घेऊन तिकडे गेले होते.

सुभाषिणीच्या मुलीला मी दागिने घालून सजवली—घरवालीचाही रीतसर अहेर देऊन संभावना केली—ज्याला ज्या प्रकारें जें कांहीं द्यायचं तें देऊन मी सर्वांशीं तोंडभर बोलून आलें.

मला दिसून आलं, कीं घरवालीचा माझ्यावर आणि माझ्या पतिराजांवर चांगलाच राग झाला होता. आपल्या मुलाच्या जेवणाखाणाची फार आबाळ होतेय असं शंभर वेळ त्यांनीं आम्हांला ऐकवलं. एक दिवस मी रमणबाबूंना माझ्या हातचा सैंपाक करून वाढला.—पण त्यानंतर मी कधीं तिकडे गेलें नाहीं—सैंपाक करायच्या भीतीनं नव्हे—घरवालीला वाईट वाटेल म्हणून.

बरेच दिवस झाले. रामरामदत्त आणि त्यांची पत्नी स्वर्गवासी झालीं पण माझं तिकडे जाणं झालं नाहीं. सुभाषिणीला मी विसरलें नाहीं—या जन्मीं तरी केव्हांही मला तिचा विसर पडायचा नाहीं. सुभाषिणीसारखी दुसरी कुणीही या जगांत मला कधींच दिसून आली नाहीं.

---

# युगलांगुरीय

## ( दोन आंगठ्या )

### १

★ **तीं** दोघेंही उद्यानांतल्या लता मंडपाच्या खालीं उभीं होतीं. त्या काळांत ताम्रलिप्त या प्राचीन नगरीचे पाय धूत अफाट समुद्र हळुहळु घोंघावत होता.

ताम्रलिप्त नगरांतल्या एका भागांत समुद्रकाठीं एक विचित्र वाडा होता. त्या वाड्याशेजारीं एक सुंदर आंबराई होती. त्या आंबराईचे मालक होते धनदास नामक एक श्रेष्ठी. त्या श्रेष्ठींची मुलगी हिरण्मयी तिथल्या लतामंडपांत एका तरुणाबरोबर बोलत होती.

हिरण्मयीचें विवाहाचें वय उलटून गेलें होतें. अकरावें वर्ष लागल्यापासून मनासारखा पती मिळावा म्हणून सारखीं पांच वर्षें समुद्रकांठच्या सागरेश्वरी देवीची ती पूजा करीत होती, पण तिचे मनोरथ पूर्ण झाले नाहींत. ही वयांत आलेली मुलगी एकटीच एका तरुणाबरोबर कां बोलत बसते तें सर्वांना माहीत होतें.

हिरण्मयी ज्यावेळीं चार वर्षांची होती, त्यावेळीं हा तरुण आठ वर्षांचा होता. त्याचा बाप शचिसुत श्रेष्ठी धनदासाचा शेजारी असल्यानें तीं दोन्ही मुलें एकत्र खेळत वाढलीं होतीं. केव्हां शचिसुताच्या घरीं, तर केव्हां धनदासाच्या घरीं तीं दोघेंही रहात होतीं. आतां ती मुलगी सोळा वर्षांची झाली होती आणि तो तरुण वीस वर्षांचा झाला होता, तरी तें त्यांचें बालपणापासूनचें नातें तसेंच कायम होतें.

त्यांत विघ्न आलें तें एकदांच. त्या दोघांच्याही वडिलांनीं त्यांचें लग्न ठरवलें. तिथिनिश्चयसुद्धां झाला, पण एकाएकीं हिरण्मयीचा बाप म्हणाला, " मला हें लग्न मंजूर नाहीं. "

तेव्हांपासून हिरण्मयी आणि पुरंदर हीं एकमेकांना भेटेनाशीं झालीं. आज पुरंदरनें नानाप्रकारें विनवणी करून, तसेंच महत्त्वाचें काम आहे म्हणून हिरण्मयीला बोलावून आणलें होतें.

लतामंडपांत आल्यावर हिरण्मयी म्हणाली, " मला कां बोलावलंस ? आतां मी कांहीं लहान मुलगी नाहीं. अशी एकांतांत तुझी भेट घेणं बरं नाहीं. यानंतर कधीं तूं बोलावलंस तर मी मुळींच येणार नाहीं. "

' सोळावर्षांची मुलगी, मी मुलगी नाहीं, ' असं म्हणते तें ऐकायला गोड लागतें, पण त्या दृष्टीनें तें ऐकायला तिथें कुणी नव्हतें. पुरंदरचें तें वयही नव्हतें आणि त्याची तशी मनःस्थितीही नव्हती.

मंडपांतल्या एका वेलीचें एक फूल काढून घेऊन त्याच्या पाकळ्या तो खुडून टाकीत होता. तो म्हणाला, " यापुढं मी तुला बोलावणार नाहीं. मी प्रवासाला निघालों आहें, सिंहल देशांत जाणार आहें, म्हणून मी तुला बोलावलं. "

" सिंहल देशांत ? " हिरण्मयीनें विचारलें, " तें कां ? सिंहल देशांत कशाला ?"

पुरंदर म्हणाला, " कां म्हणजे काय ? आम्ही श्रेष्ठी—व्यापारी लोक-व्यापारासाठीं जायला हवं. " बोलत असतांना त्याच्या डोळ्यांतून खळखळ आसवें ओघळलीं.

हिरण्मयी अस्वस्थ झाली. ती कांहीं बोलली नाहीं. सारखी नजर लावून ती समुद्राच्या लाटांवर होणारा सूर्यकिरणांचा खेळ पहात होती.

जमिनीवर एक सुकलेलें फूल पडलें होतें. त्याच्याकडे पहात ती म्हणाली, " तूं कां जातो आहेस ? यापूर्वी तुझे वडील जात होते ना ? "

पुरंदर म्हणाला, " माझे वडील आतां वृद्ध झाले आहेत. आतां यापुढं मलाच व्यापारांत लक्ष घातलं पाहिजे. बाबांच्या संमतीनंच मी जातों आहें. "

लतामंडपाच्या खांबाला टेंकून हिरण्मयी उभी राहिली होती. तिच्या कपाळाला

आठ्या पडल्या. तिचे ओंठ थरथरले. नाकपुड्या फुरफुरल्या आणि पुरंदर तिच्याकडे पहात असतांना तिला एकदम रडूं कोसळलें.

पुरंदरनेंही तोंड फिरवलें. त्याच्या डोळ्यांतलीं आसवें देखील गालावरून वहात होतीं. डोळे पुसून घेऊन तो म्हणाला, " हेंच सांगायला मी आलों होतों. तुझं अन् माझं लग्न होणं अशक्य आहे, असं ज्या दिवशीं तुझ्या वडिलांनीं सांगितलं तेव्हांच मी सिंहल देशाला जायचा निश्चय केला होता. तिथून परत यायचं नाहीं असं मला वाटतंय. ज्या क्षणाला मला तुझा विसर पडेल तेव्हांच मी परत येईन. मला अधिक कांहीं बोलतां येत नाहीं आणि बोललों तरी तुला तें कळायचं नाहीं, पण एवढं एकच माझं सांगणं ध्यानांत ठेव, माझ्यालेखीं हें जग आणि तूं यांची तुलना केली तर तूं मात्र अतुल्यच रहाशील." असें म्हणून पुरंदरनें चटकन् मान वळवली आणि शेजारच्या झाडाचें एक पान काढून घेऊन तो तें खुडून टाकूं लागला.

डोळ्यांत येणाऱ्या आसवांचा वेग ओसरला तेव्हां तो तिला म्हणाला, " तुझं माझ्यावर प्रेम आहे हें मी जाणतों, पण आज ना उद्यां तुला दुसऱ्या कुणाची तरी पत्नी व्हावं लागणार. यापुढं तूं मला विसरून जा. ईश्वर करो आणि या जन्मीं तुझी माझी भेट कधींच न होवो." असें म्हणून पुरंदर एकदम तिथून निघून गेला.

हिरण्मयी तिथेंच बसून रडत होती. रडें ओसरल्यावर ती आपल्याशींच म्हणाली, " आज जर मी मेलें तर पुरंदर सिंहल देशाला जाईल का? मग वेलीचा फांस लावून घेऊन मी जीव कां देऊं नये?—कां समुद्रांत उडी घेऊं नये?" पुन्हां तिला वाटलं, " मी मेलें अन् पुरंदर सिंहल देशांत गेला किंवा न गेला, तर मला त्याचं काय?"

हिरण्मयी पुन्हा रडूं लागली.

• •

## २

★ **पुरंदरबरोबर** हिरणचें लग्न होऊं देणार नाहीं, असें धनदास कां म्हणाला तें कुणालाच माहित नव्हतें. कुणी विचारलें तर तो म्हणे, कीं तसेंच कांहीं कारण आहे, पण तें त्यानें कुणाकडेच उघड करून

सांगितलें नव्हतें. हिरण्मयीला इतर दुसऱ्या मागण्या आल्या होत्या, पण तो तिच्या लग्नाची गोष्टच काढित नव्हता. मुलगी फार वाढली म्हणून त्याची बायको सारखी तक्रार करी, पण तो तिकडे लक्ष देत नव्हता. गुरुदेव आल्यावर मग काय तें पाहूं, असेंच तो तिला सांगत होता.

पुरंदर सिंहल देशाला गेला. तिकडे जाऊन त्याला दोन वर्षें झालीं, तरीही तो आपल्या गांवी आला नाहीं. तितक्यांत हिरण्मयीचेंही लग्न झालें नव्हतें.

हिरण आतां अठरा वर्षांची झाली होती. भरगच्च बागेंत मधेंच फुललेल्या एकाद्या सूर्यकमलासारखी साऱ्या घरांत ती उठावून दिसत होती. आपलें लग्न झालें नाहीं याजबद्दल तिला कांहींच वाटत नव्हतें. उलट लग्नाची गोष्ट निघाली तर तिला पुरंदरची आठवण येई. त्याचें रूप, गूण, सौंदर्य तिच्या नजरेसमोर येत. नखशिखांत भरगच्च पोशाख केलेल्या त्या मूर्तीची आठवण आली म्हणजे ती रडूं लागे.

बापानें हुकूम केला असता तर तिला कुणाही बरोबर लग्न करावें लागलें असतें. जिवंत असून मेल्यासारखें आयुष्य कंठावें लागलें असतें. तिचा बाप तिच्या लग्नाच्या बाबतींत मुळीं गोष्टच्च काढीत नव्हता हें पाहून ती आल्हादित झाली असेल कीं नसेल, पण आश्चर्यचकित मात्र झाली होती. एवढ्या वयापर्यंत त्यावेळीं कुणी मुलीला लग्न केल्याशिवाय ठेवीत नव्हता—कसेंबसें लग्न करून देत होता—असें असतांना तो लग्नाची गोष्ट नुसती ऐकूनसुद्धां कां घेत नाहीं, तें तिला कळत नव्हतें.

एके दिवशीं तिला या प्रकरणाचा अचानक सुगावा लागला. धनदासला त्याच्या व्यापाराच्या निमित्तानें चीन देशांतील एक विचित्र अशी छोटी पेटी मिळाली होती. धनदासची बायको त्या पेटींत आपले दागिने ठेवीत असे. धनदासनें आपल्या बायकोसाठीं कांहीं नवीन दागिने करून आणले, तेव्हां तिनें आपले जुने दागिने पेटीसकट आपल्या मुलीला दिले. ते दागिने काढून पहात असतांना हिरण्मयीला आंत एक फाटलेला कागदाचा कपटा सांपडला.

हिरण्मयीला वाचतां येत होतें, अर्थात सुरवातीलाच त्याच्यावर तिचेंच नांव लिहिलेलें दिसून येतांच तिची जिज्ञासा जागृत झाली. त्या अर्ध्या तुकड्यावरून आंतील मजकुराचा अर्थबोध होत नव्हता, तरी पण तो अर्धवट मजकूर

वाचूनही तिच्या अंगावर भीतीनें कांटा उभा राहिला. तो मजकूर कुणाला उद्देशून लिहिला होता तें कळायलाही कांहीं मार्ग नव्हता.

फाटलेल्या कागदावरचा मजकूर असा होता:—

ज्योतिष्यानें गणीत करून पाहिलें.

हिरण्मयीसारख्या सोन्याच्या पुतळीला

वाह झाल्यास भयंकर आपत्ती

पर्यंत एकमेकांचें तोंड

होणें शक्य आहे.

पुढें कांहीं तरी अज्ञात असें संकट येणार या अपेक्षेनें हिरण्मयी अतिशय घाबरून गेली. कुणाला कांहींच न सांगतां तिनं तो फाटका कागद जपून ठेवला.



## ३

★ **आणखी** एक वर्ष गेलें. तीन वर्षं झालीं, तरीही पुरंदर गांवीं येण्याचें कोणतेंही लक्षण दिसलें नाहीं. हिरण्मयीच्या हृदयांत मात्र त्याची मूर्ति पूर्वीच्या इतकीच ठसून राहिली होती. अजून आपली आठवण पक्की असल्यामुळें पुरंदर परत आला नाहीं असें तिला निश्चयपूर्वक वाटत होतें.

अशा रीतीनें तीन वर्षं गेल्यावर एके दिवशीं अकस्मात धनदास म्हणाला, " चला आपण सारीं काशीला जाऊं. गुरुदेवांचा शिष्य आला आहे आणि गुरुदेवांनीं आपणा सर्वांना तिकडे बोलावलं आहे. हिरण्मयीचं लग्न तिथंच आहे. तिथलंच स्थळ त्यांनीं ठरवलं आहे. "

बायको आणि मुलीला घेऊन धनदास काशीला जायला निघाले. ते काशीला जाऊन पोंहचतांच त्यांचे गुरू आनंदस्वामी त्यांना येऊन भेटले आणि लग्नाचा तिथिनिश्चय करून यथाशास्त्र पुढील उद्योगाला लागले.

लग्नाची सारी तयारी सुरू होती पण ती शास्त्रोक्त विधीपुरतीच. इतर कोणतेंच अवडंबर नव्हतें. धनदासच्या कुटुंबांतील मंडळीखेरीज ही लग्नाची बातमी इतर कुणालाच कळली नव्हती. फक्त शास्त्रोक्त विधी तेवढे करण्याची व्यवस्था केली होती.

लग्नाच्या दिवशीं संध्याकाळ उलटून गेली. एक प्रहर रात्रीं लग्न होतें, पण घरांत असलेल्या मंडळीखेरीज तिथें दुसरें कुणी आलें नव्हतें—अगदीं शेजारची माणसेंसुद्धां नव्हतीं. घरांतल्या कुणालाही—धनदास खेरीज करून—वर कोणता तेंही माहित नव्हतें. आनंदस्वामीनीं ज्याअर्थीं ही वरयोजना केली होती, त्याअर्थीं ती योग्यच असेल असें सर्व धरून चालत होते. कां म्हणून त्यांनीं वराचा परिचय कुणाला सांगितला नाहीं तें त्यांचें त्यांनाच माहित होतें—त्यांचा उद्देश कुणाला कसा कळावा ?

एका खोलींत कन्यादानाची तयारी करून पुरोहित एकटेच बसले होते. खोलीबाहेर धनदास वराची वाट पहात राहिले होते. अंतःपुरांत हिरण्मयी वधूचा पोषाख करून बसून राहिली होती. दुसरें तिथें कुणीच नव्हतें. हिरण्मयीला वाटलें, " हें रहस्य आहे तरी काय ? पुरंदरबरोबर जर आपलं लग्न होत नाहीं, तर तें कुणाबरोबर कां होईना, तो केव्हांही माझा पती होणार नाहीं. "

थोड्या वेळानें धनदास मुलीला बोलावायला आला. कन्यादानाच्या जागीं तिला घेऊन जायच्यापूर्वी त्यानें तिचे डोळे रुमालानें घट्ट बांधले. हिरण्मयीनें विचारलें, " हें काय आहे बाबा ? "

धनदास म्हणाला, " गुरुदेवांची आज्ञा. त्यांच्या आज्ञेबरहुकूम सारं कांहीं झालं पाहिजे. पुरोहित मंत्र सांगतील त्यांचा उच्चार मनांतल्या मनांत कर. "

यावर हिरण्मयी कांहीं बोलली नाहीं. मुलीचा हात धरून धनदास तिला लग्नवेदीकडे घेऊन गेला.

त्या जागीं गेल्यावर हिरण्मयीला जर पाहातां आलें असतें तर तिला दिसून आलें असतें, कीं वराचेही डोळे तसेच बांधले होते. लग्न लागलें तें हें असें. तिथें गुरू, पुरोहित आणि मुलीचा बाप यांच्याखेरीज दुसरें कुणीच नव्हतें. वधुवरांची शुभदृष्टी झाली नाहीं. एकमेकांनीं एकमेकांना पाहिलें नाहीं.

विवाहविधी उरकल्यावर आनंदस्वामी वरवधूंना म्हणाले, " तुमचं लग्न झालं आहे. तुम्ही एकमेकांना पाहिलेलं नाहीं. मुलीचं कुंवारपण नाहींसं करणं हाच या लग्नाचा उद्देश. याजन्मीं तुम्हीं दोघं एकमेकांना भेटाल कीं नाहीं तेंही सांगतां येत नाहीं. जर कदाचित भेट झालीच तर तुम्ही एकमेकांना ओळखूं

शकणार नाहीं—ती ओळख पटायचा एक उपाय मी करून ठेवतों आहें. माझ्या हातीं या दोन आंगठ्या आहेत. दोन्हीं अगदीं एकासारख्या एक आहेत. या आंगठ्या दगडाच्या घडवलेल्या आहेत. अशा दुसऱ्या आंगठ्या मिळणं अशक्य आहे. आंगठीच्या अंतर्भागाला एक मोराचं चित्र काढलेलं आहे. यांतली एक वराच्या हातीं घालतों अन् दुसरी वधूच्या हातीं. ध्यानांत ठेवा, ही अशी आंगठी दुसऱ्या कुठं मिळायची नाहीं—विशेषतः आंतल्या मोराच्या चित्रासारखं चित्र दुसऱ्या कुणाला काढतां यायचं नाहीं. तें चित्र मी स्वतः खोदलं आहे. कुणा स्त्रीच्या हातांत अशीच आंगठी दिसली तर वरानें तीच आपली पत्नी आहे असें समजावें. कुणा पुरुषाच्या हातांत अशीच आंगठी दिसली कीं मुलीनं समजावं कीं तोच आपला पती. ही आंगठी हरवूं नका, कुणालाही देऊं नका, उपाशीं मरायची वेळ आली तरी ही विकूं नका. आणखी एक विशेष गोष्ट सांगून ठेवतों—आजपासून पांच वर्षेंपर्यंत ही आंगठी हातांत घालूं नका. आज आषाढ महिन्याची शुक्ल पंचमी आहे. रात्रीच्या अकरा घटका झाल्या आहेत. आजपासून अशाच पांचव्या आषाढ शुद्ध पंचमीची अकरा घटका रात्र होईपर्यंत ही आंगठी हातांत घालायची नाहीं. माझ्या या निषेधाचा भंग केला तर त्याचा परिणाम फार भयंकर होईल." असें म्हणून आनंदस्वामी तिथून चालते झाले.

धनदासानें मुलीचे डोळे सोडले. डोळे उघडल्यावर तिला दिसून आलें, कीं तिथें फक्त तिचा बाप आणि पुरोहित एवढींच दोन माणसें होतीं. तिचा पति निघून गेला होता.

विवाहाची ती पहिली रात्र तिनें एकटीनेंच घालवली.

• •

## ४

★ **लग्नविधी** उरकल्यानंतर धनदास आपली पत्नी आणि मुलीला घेऊन आपल्या गांवीं आला. त्यानंतर आणखी चार वर्षें गेलीं. पुरंदर अजूनही आला नव्हता. आतां तो आला काय आणि न आला काय, हिरण्मयीच्या लेखीं सारखेंच होतें.

या सात वर्षांत पुरंदर परत आला नाहीं हें पाहून हिरण्मयी फार दुःखी होत होती. तिला वाटे, 'अजूनही माझा विसर पडला नाहीं म्हणून तो आला नाहीं, हें अगदींच असंभवनीय. तो हयात आहे कीं नाहीं त्याचीच शंका आहे. आतां त्याच्या भेटीची मला जरूरी नाहीं. मी आतां परक्याची स्त्री झालें आहें—पण माझा बाळमित्र जगूनवाचून असूंदे अशी इच्छा मी कां करूं नये?'

कोणत्या ना कोणत्या कारणानें धनदास चिंताग्रस्त झाला होता. त्या चिंतेचा परिणाम शेवटीं तो आजारी पडण्यांत झाला. थोड्याच दिवसांत तो स्वर्गवासी झाला. त्याची पत्नीही त्याच्या मृत्यूनंतर आजारी पडली. हिरण्मयीला दुसऱ्या कुणाचा आधार नव्हता, तेव्हां ती आईचे पाय धरून रडून विनंति करीत होती, कीं तूं तरी जगून रहा. ती तिची विनंती फुकट गेली आणि हिरण्मयी या जगांत एकटी पडली.

मृत्यूशय्येवर असतांना हिरण्मयीच्या आईनें तिची समजूत घालून तिला सांगितलें, "कसलीच काळजी करायचं तुला कारण नाहीं बेटा. तुझा पती कुठंतरी आहे खास! ठराविक काळ उलटून गेल्यावर कदाचित त्याची तुझी भेट होईल देखील. तशी कदाचित नाहींच झाली तरी तूं कांहीं अगदींच पोरसवदा नाहींस. या जगांत ज्याच्या आधारावर जगतां येतं असं साधन एकच—पैसा—तो तुझ्याकडे विपुल प्रमाणांत आहे."

पण तो तिचा भ्रम होता असें शेवटीं ठरलें. धनदासच्या मृत्यूनंतर कळून आलें, कीं त्यानें मागें कांहींच ठेवलें नव्हतें. वाडा, दागिने आणि घरांत असलेलं सामानसुमान याखेरीज कांहींच शिल्लक राहिलें नव्हतें.

तपास करतांना हिरण्मयीला कळून आलें, कीं गेलीं कांहीं वर्षें धनदासला व्यापारांत बरीच खूट आली होती. ती परिस्थिती कुणालाच कळूं न देतां तो त्यांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करीत होता. त्याच्या चिंतेचें कारण होतें तें हेंच. शेवटीं ती कर्जाची फेड करणें अशक्य ठरलें आणि त्याच धक्क्यानें तो मरण पावला.

धनदासाचें जे घेणेकरी होते ते हिरण्मयीपाशीं आले आणि आपल्या कर्जफेडीची मागणी करूं लागले. हिरण्मयीनें चौकशी करून पाहिलें तेव्हां त्यांची मागणी योग्य होती असें तिला दिसून आलें. रहात्या घरापर्यंत सर्व कांहीं विकून टाकून तिनें बापाचें कर्ज फेडून टाकलें.

आतां हिरण्मयी अन्नवस्त्राला सुद्धां महाग झाली होती. गांवाच्या एका टोकाला एका झोंपडींत ती रहात होती. आपलें म्हणायला तिला एक आनंदस्वामीखेरीज आधार द्यायला दुसरें कुणीच नव्हतें. ते त्यावेळीं दूर देशांत होते आणि त्यांच्याकडे हिरण्मयीला घेऊन जाईल असा विश्वासाचा कुणीच माणूस नव्हता.

• •

५

★ हिरण्मयी तरुण होती, तशीच सुंदरही होती. कुठल्यातरी वस्तींतल्या एका घरांत तिनें एकटेंच रहाणें धोक्याचें होतें. त्यांत जसा धोका होता, तसाच कलंकही होता.

ती रहात होती त्या घराच्या शेजारींच अमला नांवाची एक गवळण होती. ती विधवा होती. ही गवळण आतां बरीच प्रौढ झाली होती. तिला एक लहान मुलगा आणि कांहीं मुली होत्या. तिची चालचलणूक निर्दोष असल्याबद्दल सर्वत्र ख्याती होती, म्हणून हिरण्मयी रात्रीच्या वेळीं तिच्या घराचा आश्रय घेत असे.

एके दिवशी हिरण्मयी अमलेच्या घरीं झोंपण्यासाठीं आली, त्यावेळीं अमला तिला म्हणाली, " मला कुणीतरी सांगितलं कीं पुरंदरशेट आठ वर्षांनीं पुन्हां आपल्या गांवीं आला आहे. "

तें ऐकून हिरण्मयीनें डोळ्यांतलीं आसवें तिला न दिसावीं म्हणून तोंड फिरवलें. या जगाशीं असलेला तिचा शेवटचा धागा तुटला होता. पुरंदर आतां तिला विसरला असावा—नाहींतर तो आला नसता !

पुरंदराला आठवण असो वा नसो, त्यांत आतां तिचें नफा नुकसान काय होतें ? तरीही ज्याच्या स्नेहाची आठवण ठेवून तिनें आजवर आपलें जीवन कंठिलें होतें, तो आतां आपल्याला विसरला हें मनांत येऊन हिरण्मयीला फार दुःख झालें. त्याचा बाप स्वर्गवासी झाला होता. अर्थात त्याला परत येण्याखेरीज गत्यंतर नव्हतें. कदाचित तो विसरलाही नसेल ! पण आपल्यापायीं त्यानें किती दिवस परदेशांत रहावें ? तिला वाटलें, " मी खरोखरच कुलटा. दुसऱ्याची विवाहित पत्नी असून पुरंदरची आठवण मला कां यावी ? "

अमला म्हणाली, " हा पुरंदर आठवतो ना तुला ? शचिसुत शेटचा तो मुलगा. "

" मी ओळखतें त्याला. " हिरण्मयी म्हणाली.

अमला म्हणाली, " तो नुसताच आला नाहीं. गलबतं भरभरून त्यानं इतकी संपत्ति आणली आहे, कीं त्याची मोजदादसुद्धां व्हायची नाहीं. इतकी संपत्ती या तामलिप्तींत कुणी पाहिलीसुद्धां नसेल. "

हिरण्मयीच्या हृदयांतलें रक्त जरा जोरानें वाहूं लागलें. तिला आपल्या प्रस्तुतच्या दारिद्र्याची आठवण झाली, तशीच पूर्वीच्या नात्याचीही आठवण झाली. दारिद्र्याची जाचणी महादुर्घर. ही संपत्ती कदाचित आपली झाली असती ही कल्पना मनांत येऊनच तिच्या हृदयांतलें रक्त जोरानें वाहूं लागलें होतें— कुठल्या स्त्रीला असें वाटणार नाहीं ?

कांहीं वेळपर्यंत हिरण्मयी विचुकपणें स्तब्ध राहिली होती. नंतर तिनें इकडल्या तिकडल्या गोष्टी सुरू केल्या. शेवटीं झोंपायला जातांना तिनें विचारलें, " अमले, त्या शेटच्या मुलाचं लग्न झालंय काय ग ? "

अमला म्हणाली, " नाहीं. अजून त्याचं लग्न झालं नाहीं. "

हिरण्मयीचें सर्वांग ढांसळल्यासारखें झालें. त्या रात्रीं यानंतर ती कांहींच बोलली नाहीं.

● ●

## ६

★ एके दिवशीं अमला हंसत हंसत हिरण्मयीपाशीं आली आणि तिला खिजवून म्हणाली, " काय ग पोरी, ही काय तुझी चाल ? "

" काय केलं मी ? " हिरण्मयीनें विचारलें.

" इतके दिवस माझ्याशीं हें बोलली नाहींस कशी ? "

" काय बोललें नाहीं ? "

" पुरंदरशेटबरोबर तुझं एवढं जवळचं नातं आहे हें कसं सांगितलं नाहींस मला ? "

हिरण्मयी थोडीशी शरमली आणि म्हणाली, " लहानपणी आम्हीं शेजारीं शेजारीं रहात होतों. त्यांत सांगायचं काय ? "

" नुसते शेजारी ! " अमला म्हणाली, " पहा मी काय आणलंय तें ! " असें म्हणून तिनें एक छोटीशी पेटी तिला दाखवली. त्या पेटींत एक महामोलवान असा हिऱ्याचा हार होता. हिरण्मयी व्यापाऱ्याची मुलगी—तिला हिरेमाणकांची पारख होती. तो हार पाहून ती चकित झाली आणि म्हणाली, " हा हार तर महामोलवान आहे. कुठून आणलास हा ? "

" पुरंदरनं हा तुझ्यासाठीं पाठवून दिला आहे. " अमला म्हणाली, " तूं माझ्या घरीं रहातेस असं त्याला कळलं तेव्हां त्यानं मला बोलावून घेतलं अन् तुला देण्यासाठीं हा हार दिला. "

हिरण्मयीनें विचार करून पाहिलें. या हाराचा स्वीकार केला तर जन्माचें दारिद्र्य दूर होईल. धनदासाच्या लाडक्या मुलीला अन्नवस्त्राच्या अभावीं तळमळत रहावें लागणार नाहीं.

क्षणभर तिचें मन चळल्यासारखें झालें होतें, पण लगेच एक मोटा सुस्कारा सोडून ती म्हणाली, " अमला, त्या शेटजीला सांग, कीं मला ही देणगी घेतां येत नाहीं. "

अमला अचंबित झाली. ती म्हणाली, " म्हणतेस काय ? तुला वेड लागलंय कीं माझं सांगणं तुला खरंच वाटत नाहीं ? "

" तुझं सांगणं मला खरं वाटतं अमले, " हिरण्मयी म्हणाली, " अन् मी वेडीही नाहीं, तरीपण तो हार मी घेणार नाहीं. "

अमलेनें तिची चांगलीच हजेरी घेतली, पण हिरण्मयी कांहीं केल्या ऐकेना.

अमलेनें मनाशीं विचार करून तो हार घेऊन ती राजा मदनदेवापाशीं गेली. राजाला प्रणाम करून तिनें तो हार त्याला अर्पण केला. ती म्हणाली, " हा हार आपल्या सारख्यांनाच शोभेल. आपण तो स्वीकारला पाहिजे. "

राजानें तो हार घेतला आणि पुष्कळसें द्रव्य देऊन तिची संभावना केली. हिरण्मयीला मात्र यांतलें कांहींच कळलें नाहीं.

यानंतर कांहीं दिवसांनीं पुरंदरची एक दासी हिरण्मयीपाशीं आली. ती म्हणाली, " माझ्या धन्यांनीं तुम्हाला सांगून पाठवलं आहे, कीं तुम्ही एका झोंपडींत राहातां तें त्याच्यानं पहावत नाहीं. तुम्ही त्यांच्या बाळमैत्रिण, जें घर त्यांचं तेंच तुमचें, तरीपण आपल्या घरीं येऊन रहा असं कांहीं ते म्हणत

नाहींत. धनदासच्या सावकाराकडून त्यांनीं तुमचं घर विकत घेतलंय अन् तें तुम्हाला दिलंय. तुम्हीं जाऊन तिथं रहावं एवढंच त्यांचं मागणं आहे."

दारिद्र्याच्यापायीं हिरण्मयीला जीं दुःखें भोगावीं लागत होतीं त्यांत बापाच्या घरांतून निर्वासित होण्याचें दुःख तिला अत्यंत जाणवत होतें. जिथें तिचें बालपण गेलें, आईबापांचा सहवास घडला, जिथें तिच्या आईबापांनीं देह ठेवला, तिथें आपल्याला राहातां येत नाहीं हें पाहून तिच्या मनाला फार यातना होत होत्या. त्या घराची गोष्ट निघतांच तिच्या डोळ्यांना पाणी आलें.

दासीला आशीर्वाद देऊन ती म्हणाली, "हें दान घेणं माझ्यालेखीं उचित नाहीं, पण हा लोभ मला आवरतां येत नाहीं. ईश्वर तुझ्या धन्याचं सर्व प्रकारें कल्याण करो!"

हिरण्मयीला नमस्कार करून ती दासी निघून गेली. त्यावेळीं अमला तिथेंच होती. हिरण्मयी तिला म्हणाली, "अमला, त्या एवढ्या मोठ्या घरांत एकटं रहाणं मला कठीण जाईल. तूं सुद्धां तिथंच रहायला चल."

अमलेनें कबुली दिली. त्या दोघीही धनदासच्या घरांत राहूं लागल्या. अमला मधून मधून पुरंदरच्या घरीं जात असे, तिला हिरण्मयीनें तिकडे जायची मनाई केली. अमलेनें पुरंदरच्या घरीं जाणें बन्द केलें.

बापाच्या घरीं येऊन राहिल्या दिवसापासून हिरण्मयीला एका बाबतींत मोठें आश्चर्य वाटत होतें. आपला घरखर्च चालतो कसा? अमलेला तिनें विचारलें तेव्हां ती म्हणाली, "हा संसार चालवायची काळजी तूं करूं नकोस अन् स्वतःही कांहीं कष्ट घेऊं नकोस. राजाच्या वाड्यांत मला काम मिळालंय. आतां आपल्याला पैशाचा अभाव नाहीं. मी सारा घरखर्च चालवीन—तूं नुसती घरधनीण या नात्यानं आनंदांत रहा."

हिरण्मयीला दिसून आलें होतें, कीं अमलेपाशीं भरपूर पैसा होता. तिच्या मनांत नानाप्रकारच्या कुशंका येत होत्या.

• •

## ७

★ हिरण्मयीच्या लग्नाला आतां पांच वर्षें होऊन गेलीं होतीं. आषाढाची शुक्लपंचमी आली. हिरण्मयीला तो दिवस आठवला. त्या दिवशीं संध्याकाळीं ती अस्वस्थ होऊन बसली होती. ती आपल्याशींच

म्हणत होती, " गुरुदेवांच्या आज्ञेप्रमाणें उद्यांपासून मला ती आंगठी घालतां येईल ! कशाला ती आंगठी घालायची ? ती आंगठी घातल्यापासून काय लाभ होणार आहे मला ? कदाचित माझा नवरा सांपडेल, पण आतां ती इच्छा माझ्या मनांत राहिली नाहीं. परक्याची मूर्ति रोज कां म्हणून मी माझ्या डोळ्यांसमोर उभी करतें ? या अनावर हृदयाला शिक्षाच केली पाहिजे, नाहीं-तर धर्माच्या दृष्टीनं मी पतित होईन. "

तितक्यांत अमला घाबरीघुबरी होऊन आली आणि म्हणाली, " कांहीं तरी भयंकर झालं आहे ! मला कांहीं कळत नाहीं ! काय होणार आहे कोण जाणे ! "

" काय झालं आहे ? " हिरण्मयीनें विचारलें.

अमला म्हणाली, " राजवाड्यांतून तुझ्यासाठीं मेणा घेऊन दासदासी आल्या आहेत. तुला घेऊन जाणार आहेत म्हणे. "

" खास तुला वेड लागलंय ! " हिरण्मयी म्हणाली, " मला राजवाड्यांत न्यायला कोण कशाला येईल ? "

इतक्यांत राजदूती आली आणि तिनें हिरण्मयीला प्रणाम केला. ती म्हणाली, " राजाधिराज परमभट्टारक श्री मदनदेवाची आज्ञा आहे—हिरण्मयीनं याच क्षणाला शिबिकारोहण करून राजवाड्यांत यावं. "

हिरण्मयी आश्चर्यचकित झाली, पण ती राजाज्ञा होती, ती मोडतां येणं शक्य नव्हतें, विशेषतः राजा मदनदेवाच्या भेटीला जाण्यांत शंका घेण्याचं कांहीं कारण नव्हतं. तो राजा मोठा धार्मिक आणि जितेंद्रिय असल्याबद्दलची ख्याती होती. त्याच्या धाकामुळें कुठल्याही राजपुरुषाला कुणाही स्त्रीवर अत्याचार करण्याची छाती होत नसे.

हिरण्मयी अमलेला म्हणाली, " अमले, राजदर्शनाला आतां गेलंच पाहिजे. तूं माझ्याबरोबर चल. "

अमला ' होय ' म्हणाली.

त्या सर्वांना बरोबर घेऊन मेण्यांत बसून हिरण्मयी राजमंदिरांत येऊन पोंचली. प्रतिहारीनें श्रेष्ठीकन्या आल्याची राजाला वर्दी दिली. राजाच्या आज्ञेप्रमाणें एकट्या हिरण्मयीलाच घेऊन प्रतिहारी राजासमोर हजर झाली. अमला बाहेरच राहिली.



## ८

★ राजाला पाहतांच हिरण्मयी आश्चर्यानें थक्क होऊन गेली. तो राजा उंचापुरा असून त्याची छाती चांगलीच रुंद होती. तो आजानुबाहू होता. त्याच्या देहाची ठेवण मोठी बांधेसुध होती. त्याचें ललाट विशाल असून डोळे पाणीदार होते. दिसण्यांत तो अगदीं शांत होता. इतका सुंदर पुरुष क्वचितच कुणा स्त्रीनें पाहिला असेल.

श्रेष्ठीच्या मुलीला पाहातांच राजालाही तसेंच वाटलें—राजमंदिरांत अशी सुंदरी क्वचितच कुणी पाहिली असेल.

" तूं हिरण्मयी का ? " राजानें विचारलें.

" मी आपली दासी. " हिरण्मयी म्हणाली.

"तुला मी कां बोलावलं तें ऐक. " राजा म्हणाला, " तुझ्या लग्नाची कथा तुला आठवते का ? "

" आठवते. " ती म्हणाली.

राजानें विचारलें, " त्या रात्रीं आनंदस्वामींनीं तुला जी आंगठी दिली होती ती आहे का तुझ्यापाशीं ? "

" ती आंगठी माझ्यापाशीं आहे महाराज, " हिरण्मयी म्हणाली, " पण ही अत्यंत गुप्त गोष्ट—महाराजांना कशी कळली ?—"

तिच्या प्रश्नाचें उत्तर न देतां राजा म्हणाला, " कुठं आहे ती आंगठी ? मला ती दाखीव पाहूं ! "

" ती आंगठी माझ्या घरींच आहे. " हिरण्मयी म्हणाली, " पांच वर्षे पुरीं व्हायला अजून कांहीं घटका आहेत— ती वेळ होऊन जाईपर्यंत ती आंगठी हातांत घालायची आनंदस्वामींनीं मनाई केली होती. "

" ठीक आहे. " राजा म्हणाला, " त्या आंगठीसारखीच दुसरी एक आंगठी आनंदस्वामींनीं तुझ्या नवऱ्यापाशीं दिली होती. ती आंगठी तुला दाखवली तर तूं ओळखशील ? "

हिरण्मयी म्हणाली, " दोन्हीही आंगठ्या अगदी सारख्याच आहेत—तेव्हां ती मला सहज ओळखतां येईल. "

राजाची आज्ञा होतांच प्रतिहारी एक सोन्याची डबी घेऊन आली. त्या डबींतली आंगठी काढून तिला दाखवून राजा म्हणाला, "पहा, हीच का ती आंगठी?"

दिव्याच्या प्रकाशांत तिनें ती आंगठी नीट निरखून पाहिली आणि म्हटलें, "महाराज हीच माझ्या पतीची आंगठी—पण ही आपल्या हातीं कशी आली?"—क्षणभर विचार करून ती म्हणाली, "आतां कळलं महाराज, आतां मी विधवा झालें आहें. बिनवारशी मृत व्यक्तीची वस्तू म्हणून ही आपल्या हातीं आली ना? हयात असल्यास त्यांनीं ही आंगठी केव्हांही हातसांड केली नसती."

राजा हंसला आणि म्हणाला, "माझ्यावर विश्वास ठेव. तूं विधवा नाहींस."

"तर मग माझा पती माझ्यापेक्षांही दरिद्री असेल, "हिरण्मयी म्हणाली, "आणि पैशाच्या लोभानं त्यानं ही आंगठी आपल्याला विकली असेल."

राजा म्हणाला, "तुझा पती मोठा धनवान आहे."

हिरण्मयी म्हणाली, "तर मग बळजबरीनं, कपटानं किंवा कौशल्यानं आपण ही आंगठी चोरून तर आणली नाहीं?"

तिचे तें बेडर भाषण ऐकून राजा थक्क झाला. तो म्हणाला, "भारीच धीट दिसतेस तूं! राजा मदनदेवाला चोर म्हणायची कुणाची प्राज्ञा नव्हती."

"तर मग ही आंगठी आपल्याला मिळाली कुठं?" तिनें विचारलें.

राजा म्हणाला, "तुझ्या लग्नाच्या वेळीं आनंदस्वामींनीं ही आंगठी माझ्या हातांत घातली होती."

हिरण्मयीनें शरमून मान खालीं घातली. ती म्हणाली, "आर्यपुत्र, माझ्या अपराधाची क्षमा करा. माझ्या अज्ञानामुळं मी आपल्याला टाकून बोललें."

• •

९

★ आपण राजाची राणी आहें हें कळतांच हिरण्मयी आश्चर्यचकित झाली खरी, पण तिला मुळींच आनंद झाला नाहीं—उलट ती खिन्न झाली. तिला वाटलें, 'इतक्या दिवसांत पुरंदर तर लाभला नाहींच,

पण परक्याची पत्नी असल्याची यातना जाणवली नव्हती. आज ती यातना सुरू झाली. माझ्या हृदयांत मी पुरंदरची पत्नी आहें—आतां दुसऱ्याची होऊन या महात्म्याचं घर कसं कलंकित करूं ? '

हिरण्मयीच्या मनांत असे विचार येत होते तोंच राजा तिला म्हणाला, " हिरण्मयी, तूं माझी राणी आहेस खरी, पण तुझा स्वीकार करायच्यापूर्वी मला कांहीं प्रश्न विचारायचे आहेत. कसलाही मोबदला न देतां तूं पुरंदरच्या घरांत ये जा कां करतेस ? "

हिरण्मयी अधिकच शरमिंदी झाली. राजा मदनदेव काय सर्वज्ञ आहे, असा प्रश्न तिच्यासमोर उभा राहिला.

पुन्हां राजानें विचारलें, " आणखी एक महत्त्वाची गोष्ट आहे, तूं कुणाची तरी पत्नी असतांना पुरंदरनं दिलेला हिऱ्याचा हार तूं कसा घेतलास ? "

आतां मात्र हिरण्मयीनें उत्तर दिलें. ती म्हणाली, " आपण सर्वज्ञ आहांत असं मला वाटलं होतं, पण आतां माझी खात्री झाली, तुम्ही सर्वज्ञ नाहीं. हिऱ्याचा हार मी परत केला होता. "

राजा म्हणाला, " तो हिऱ्याचा हार तूं मला विकलास. हा पहा तो हार।" असें म्हणून राजानें तो हार काढून तिला दाखवला.

तो हार हिरण्मयीनें पाहिल्याबरोबर ओळखला. ती म्हणाली, " हा हार काय मी स्वतः येऊन आपल्याला विकला होता ? "

राजा म्हणाला, " नाहीं. तुझी दासी किंवा दूती अमला हिनं हा हार मला विकला. बोलावूं का तिला ? "

आतांपर्यंत गंभीर असलेल्या हिरण्मयीच्या चेहऱ्यावर यावेळीं थोडीशी हास्याची रेषा दिसली. ती म्हणाली, " मला क्षमा करा. अमलेला बोलावायची जरूरी नाहीं. ही विक्री केल्याचं मी कबूल करतें. "

यावेळीं मात्र राजाच चकित झाला. तो म्हणाला, " स्त्रीजातीचं चरित्र कळणं मोठं कठीण ! आतां सांग, तूं कुणाची तरी पत्नी असतांना पुरंदरकडून आलेला हा हार कसा घेतलास ? "

" प्रेमाची भेट म्हणून घेतला ! " हिरण्मयी म्हणाली.

राजा अधिकच चकित झाला. त्यानें विचारलें, " म्हणजे काय ! ही प्रेमाची भेट कशी ! "

" मी कुलटा आहें महाराज, " हिरण्मयी म्हणाली, " मी आपल्याला योग्य नाहीं. मी प्रणाम करतें. मला निरोप द्या. माझ्याबरोबर लग्न लागल्याचं विसरून जा. "

राजाला प्रणाम करून हिरण्मयी जायला निघाली, तें पाहून राजाच्या चेहऱ्यावरची विस्मयाची भावना जाऊन तो एकदम प्रफुल्लित झाला. तो एकदम हंसत सुटला. हिरण्मयी मागें फिरली.

राजा म्हणाला, " हिरण्मयी, तूं जिंकलंस. मी हरलों. तूं कुलटा नाहींस आणि मीही तुझा पती नाहीं. तूं जाऊं नकोस. "

हिरण्मयी म्हणाली, " महाराज, हा प्रकार काय आहे तें मला समजावून सांगा. मी एक सामान्य स्त्री आहें. आपल्यासारख्या गंभीर वृत्तीच्या राजाधिराजांनी माझी अशी थट्टा करावी हें मोठं चमत्कारिक वाटतं. "

राजा तसाच हंसत म्हणाला, " माझ्यासारख्या राजालाच अशी थट्टा करतां येईल. आतां ऐक, सहा वर्षें झालीं, तुझ्या दागिन्याच्या पेटींत एक पत्राचा तुकडा तुला मिळाला होता ना ? तो आहे का तुझ्यापाशीं ? "

" आपण खरोखरच सर्वज्ञ आहां महाराज, " हिरण्मयी म्हणाली, " तो कागदाचा तुकडा माझ्या घरीं आहे. "

राजा म्हणाला, " तर मग अशीच मेण्यांत बसून जा आणि तो कागद घेऊन ये. तूं आलीस म्हणजे मी या सर्व प्रकारचा खुलासा करीन. "

राजाच्या आज्ञेप्रमाणें हिरण्यमयी मेण्यांत बसून आपल्या घरीं गेली आणि तो कागदाचा तुकडा घेऊन पुन्हा येऊन राजाच्यासमोर हजर झाली. राजानें तो फाटका कागद हातीं घेतला आणि आपल्याकडे असलेला दुसरा तुकडा त्याला जोडून हिरण्मयीच्या हातीं दिला. तो म्हणाला, " आतां हे तुकडे जोडून पहा. "

हिरण्मयीनें दोन्ही तुकडे जोडून पाहिले तेव्हां ते एकमेकांशीं जुळते आहेत असें तिला दिसून आलें. राजा म्हणाला, " आतां हे दोन्ही तुकडे जोडून त्यावरचा मजकूर वाच. "

हिरण्मयीनें ते तुकडे जोडून मजकूर वाचला तो असाः—

" ( ज्योतिष्यानें गणित करून पाहिलें ) त्यावरून तुम्ही जी कल्पना केली आहे, तसें करणें इष्ट नाहीं. (हिरण्मयीसारख्या सोन्याच्या पुतळीला) वैधव्याच्या खाईत लोटणें योग्य नाहीं. तिचा ( विवाह झाल्यास भयंकर

आपत्ति ) येईल. ती जन्मविधवा होईल. तरी पण पांच वर्षें ( पर्यंत एकमेकांचें तोंड ) जर त्यांनीं पाहिलें नाहीं, तर ग्रहाच्या या फलादेशांतून तिची सुटणूक ( होणें शक्य आहे. ) ती व्यवस्था मला करतां येईल. ”

ती चिठ्ठी हिरण्मयीनें वाचली तेव्हां राजा म्हणाला, “ हें पत्र आनंदस्वामीनीं तुझ्या वडिलांना लिहिलं होतं. ”

“ तें आतां मला कळलं.” हिरण्मयी म्हणाली, “ लग्नाच्या वेळीं आमचे डोळे कां बांधले, गुप्तपणें आमचा लग्नविधी कां उरकला, पांच वर्षेपर्यंत आंगठी हातांत घालायला कां बंदी केली तें आतां मला कळलं. या पलिकडे अधिक कांहीं कळलं नाहीं.”

राजा म्हणाला, “ पुरंदरबरोबर तुझं लग्न करून द्यायला तुझ्या वडिलांनीं कां नकार दिला तें आतां तुला कळलं असेल. याचमुळं पुरंदर गांव सोडून सिंव्हल देशांत गेला. इकडे आनंदस्वामींनीं चौकशी करून एक स्थळ निश्चित केलं. त्या मुलाची कुंडली त्यांनीं पाहिली. त्याचं परमायु ऐंशीं वर्षांचं होतं, पण अठराव्या वर्षाच्या सुमाराला त्याला अपमृत्यू यायचा संभव होता. त्यांनीं कुंडली पाहून ठरवलं, कीं या वयाच्या नंतर देखील पांच वर्षेपर्यंत पत्नीबरोबर एकशय्येवर असतांना त्याला मृत्यू येण्याचा संभव होता — पण हीं पांच वर्षे उलटल्यावर त्याला कांहीं धोका नव्हता असं दिसून आलं. त्या अनुरोधानं तेवीस वर्षं पुरीं झाल्यावर त्याच्याशीं लग्न करायचं ठरवलं, पण ही मुदत पुरी व्हायच्यापूर्वी कदाचित तुझं मन चळेल, किंवा तूं त्या मुदतींत चोरटं लग्न लावशील या भीतीनं स्वामीनीं तुला भीती दाखवण्यासाठीं दागिन्याच्या पेटींतून तो कागदाचा तुकडा तुझ्या हातीं पडण्याची योजना केली. त्यानंतर तुम्हां दोघांचं लग्न लावून दिल्यावर तुमची दृष्टभेट होऊं नये म्हणून त्यानीं जी व्यवस्था केली ती तुला कळलीच आहे. गेल्या कांहीं महिन्यांत मोठी चमत्कारिक परिस्थिती उत्पन्न झाली. कांहीं महिन्यापूर्वी आनंदस्वामी या शहरांत आले, त्यावेळीं तूं दारिद्र्यांत दिवस काढते आहेस हें कळून त्यांना फार दुःख झालं. ते तुला पाहून आले, पण त्यांनीं तुझी भेट घेतली नाहीं. मला भेटून त्यांनी ही सारी हकिकत सांगितली आणि म्हटलं, ‘ हिरण्मयीला असं दारिद्र्याचं दुःख भोगावं लागतं आहे, हें मला कळलं असतं तर मी तिला वचनांतून मोकळं केलं असतं. आतां हें काम मी आपल्यावर सोंपवतो आहें.

हें काम पार पाडलंत तर मी आपला जन्माचा ऋणाईत होऊन राहीन. आणखी एक महत्त्वाचं काम मला आपल्याला सांगायचं आहे, कीं हिरण्मयीचा पती याच शहरांत रहातो आहे. त्या उभयतांची दृष्टभेट न होईल अशी कांहीं तरी व्यवस्था करा.' असं म्हणून त्यांनी तुझ्या पतीचं नांव मला सांगितलं. तेव्हां-पासून अमलेच्या हातीं द्रव्य देऊन तुला दारिद्र्याचे कष्ट सहन करायची पाळी येऊं नये अशी व्यवस्था मी केली होती. कर्जदाराकडून तुझ्या बापाचं घर सोडवून घेतलं तें मीच अन् तुला तिथं रहायला लावलं तें मीच! तो हारही मीच पाठवला होता तो केवळ तुझी परीक्षा पहाण्यासाठीं."

हिरण्मयी म्हणाली, "तर मग ही दुसरी आंगठी आपल्याला कुठं मिळाली! मी तुझा पती आहें असं सांगून कां आपण माझ्याशीं प्रतारणा केलीत? पुरंदरनं दिलेल्या घरांत मी रहातें आहें म्हणून कां मला छेडलंत?"

राजा म्हणाला, "आनंदस्वामींनीं या कामाचा भार माझ्यावर सोपवल्या दिवसापासून मी तुझ्यावर पहारा ठेवला होता. आतां पांच वर्षं पुरीं होण्याचा काल आला आहे हें ध्यानीं आलं, तेव्हां मी तुझ्या नवऱ्याला बोलावून घेतलं आणि त्याला सांगितलं, 'तुझ्या लग्नाची सारी हकिकत मला माहीत आहे. ती आंगठी घेऊन तूं अकरा घटका रात्रीं इथं ये. तिथं तुझी स्त्री तुला भेटेल.' तो मला म्हणाला, 'आपली आज्ञा होते आहे म्हणून मी येईन, पण त्या स्त्रीला भेटायला मी उत्सुक नाहीं. तिची भेट न होईल तरच बरं.' मी त्याला माझ्या अधिकारांत हुकूम केला तेव्हां त्यानं होकार दिला, पण तो म्हणाला, 'त्या स्त्रीचं चारित्र्य कसं आहे तें कदाचित आपल्यालाच माहीत असेल. दुराचारी स्त्रीचा स्वीकार करायची आज्ञा आपण मला केली तर त्या पापाचे धनी आपण व्हाल.' मी त्याला म्हटलं, 'ती आंगठी माझ्याकडे दे. तुझ्या त्या स्त्रीची मी कसोटी पाहीन आणि माझी खात्री झाली तरच मी तुला तिचा स्वीकार करायला सांगेन.' तो म्हणाला, 'ही आंगठी मी दुसऱ्या कुणाला दिली नसती. आपणच मागतां म्हणून देत आहें.' मी ती आंगठी घेतली आणि तिच्या आधारावर तुझी परीक्षा घेतली. त्यांत तूं पूर्ण उतरलीस असं पाहून मला फार आनंद होत आहे."

हिरण्मयी म्हणाली, "आपण माझी कशी परीक्षा घेतली तें कांहीं मला कळलं नाहीं—" तिचं बोलणं तेवढंच राहिलं. राजवाड्यांत मंगल वाद्यांचा घोष उठलेला ऐकूं आला.

राजा म्हणाला, "अकरा घटका रात्र उलटली आहे. परीक्षेबद्दल आपण नंतर बोलूं. आतां तुझा पती येत आहे. शुभलग्नावर तुम्हां उभयतांची शुभदृष्टी आतांच झाली पाहिजे."

त्याचवेळीं मागल्या बाजूचें दार उघडलें गेलें. एक देखणा पुरुष त्या दारांतून आंत आला. राजा म्हणाला, "हिरण्मयी, हा पहा तुझा पती!"

हिरण्मयीनें मागें वळून पाहिलें—तिचें मस्तक भिरभिरलें—आपण जागी आहें कीं स्वप्नांत आहें हेंच तिला कळेना. तिनें पाहिलें—

तो पुरंदर होता.

एकमेकांनीं एकमेकांना पाहिलें. दोघेंही बेभान झालीं. त्या दोघांपैकीं कुणाचाच आपल्या दृष्टीवर विश्वास बसेना.

राजा पुरंदरला म्हणाला, "मित्रा, हिरण्मयी ही तुला अनुरूप पत्नी आहे. मोठ्या आनंदानं तिला आपल्या घरीं घेऊन जा. पूर्वीच्या इतकंच हिचं तुझ्यावरचं प्रेम अखंड आहे. मी रात्रंदिवस पहारा ठेवून हिची कसोटी पाहिली आहे. मीच तुझा पती आहें असं सांगून मी पाहिलं, पण राज्यलोभानंसुद्धां हिरण्मयी वळली नाहीं कीं तुला विसरली नाहीं. उलट तिनं, 'मी कुलटा आहें, माझा नाद सोडून द्या.' असं मला सांगितलं तें तुझ्यावरच्या प्रेमामुळंच." तो हिरण्मयीला उद्देशून म्हणाला, "मुली, तुझं मनोगत मला कळलं. दुसऱ्या कुणाचा संसर्ग येऊं नये म्हणून तूं स्वतःला कुलटा म्हणवून घेतलंस! शाबास! माझा आशीर्वाद आहे तुम्हाला, तुम्ही सुखी व्हा!"

हिरण्मयी म्हणाली, "एकच प्रश्न विचारतें—हे सिंव्हल देशांत होते; काशींत यांचं माझं लग्न झालं कसं?"

राजा म्हणाला, "आनंदस्वामीनीं पुरंदरच्या बापाची भेट घेऊन माणूस पाठवून सिंहल देशांतून त्याला परभारें काशीला नेलं आणि लग्न उरकतांच पुन्हा सिंहल देशाला पाठवून दिलं. तो ताम्रलिप्तांत आला नाहीं, म्हणूनच तो इथं आल्याचं तुम्हां कुणाला कळलं नाहीं."

पुरंदर म्हणाला, "महाराज, आपण आमचे मनोरथ जसे पूर्ण केले त्याचप्रमाणें ईश्वर तुमचे मनोरथ पूर्ण करो. आज माझ्याइतका भाग्यवान या तुमच्या राज्यांत दुसरा कुणीही सांपडणार नाहीं!"

समाप्त